


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








# अभीष्टचिंतन

अमृत महोत्सवी वर्षात पदार्पण



## ज्योत्स्ना देवधर

जन्म २७ फेब्रुवारी १९२६

अनुक्रमणिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २९३

एप्रिल २००० ते जून २०००



संपादक

ह. ल. निपुणगे







**महाराष्ट्र साहित्य परिषद**

टिळक रोड,

पुणे ४११ ०३०.

दूरध्वनी : ४४७५९६३

अनुक्रमणिका







# अनुक्रमणिका





मुद्रक-प्रकाशक : डॉ. वि. भा. देशपांडे, प्रमुख कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.
मुद्रणस्थळ : जंगम ऑफसेट प्रा. लि., २५/१०, नांदेड फाटा, पुणे ४११ ०४१.
मुखपृष्ठ रचना : स. म. जंगम
संगणकीय अक्षरजुळणी : यशश्री एंटरप्रायजेस, कोथरूड, पुणे ४११ ०२९.
मूल्य : रुपये तीस ❑ वार्षिक वर्गणी संस्थांसाठी : शंभर रुपये.
आजीव सदस्य शुल्क : रु. ५००/- वार्षिक सदस्य शुल्क : रु. ५०/-
अंक क्र. २९३ ❑ एप्रिल २००० ते जून २०००
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले आहे.

# संपादकीय



ह. ल. निपुणगे

गीतरामायणकार ग. दि. माडगूळकर यांचे निधन झाले. त्यानंतर माडगूळकरांच्या जीवन-चरित्रावर आधारित कादंबरी आपण कोणाकडून तरी लिहून घ्यावी आणि ती प्रकाशित करावी, असे माझ्या मनात आले आणि मी लेखकांच्या नावांचा विचार करू लागलो. का कुणास ठाऊक पण माझे मन प्रभाकर तामणे यांच्या नावावर स्थिरावले. नकळत डिरेक्टरी पाहून त्यांचा फोननंबर शोधून काढला आणि त्यांचा नंबर फिरवला. पलीकडे प्रा. तामणेच होते.

"मी प्रभाकर तामणे बोलतोय." ते म्हणाले.

त्यापूर्वी आमची फार ओळख नव्हती. पण ते मला नावाने ओळखत होते आणि आमची छोटीशी प्रकाशन संस्थाही त्यांना माहीत होती.

"मला तुम्हाला भेटायला यायचे आहे. केव्हा येऊ?" शक्यतो फोनवर वेळ ठरवून मगच भेटायला यावे, असा त्यांचा कटाक्ष असे, हे मला माहीत होते.

"काय काम आहे?" ते म्हणाले.

"ते आपण समक्ष भेटीतच बोलू."

"बरं मग उद्या संध्याकाळी या. ६ वाजता." ते म्हणाले.

मी 'होय' म्हणून फोन बंद केला.

दुसऱ्या दिवशी बरोबर ६ वाजता मी त्यांच्या सुभाषनगरमधील घरी गेलो.

त्यांनी माझे 'या, या.' म्हणून उत्तम स्वागत केले. अत्यंत दिलखुलास मनुष्य.

"बोला. काय काम काढलंत?"

"अहो, माडगूळकरांच्या जीवनचरित्रावर आधारित एक कादंबरी तुम्ही लिहावी आणि ती मी प्रकाशित करावी, अशी कल्पना आहे."

प्रा. तामणे यांनी क्षणभर विचार केला आणि ते म्हणाले, "सध्या माझ्या हातात खूप कामे आहेत. ती आधी पूर्ण करायला हवीत. पण मला तुमची कल्पना आवडली. मी लिहीन, पण दीड-दोन वर्षांचा अवधी लागेल. चालेल ना?"

मी 'होय' म्हणालो. पुन्हा केव्हा भेटायचे ते ठरले. इकडच्या-तिकडच्या गप्पा झाल्या आणि मी निघालो.

आणि मग आम्ही वेळोवेळी भेटतच राहिलो. कादंबरीच्या आवाक्याबद्दल, पृष्ठसंख्येबद्दल सर्व चर्चा झाली. मानधनाबद्दल ठरले. रीतसर करार झाला. कामाला सुरुवात व्हायला थोडा वेळ होता. असाच एक दिवस मी त्यांच्याकडे गेलो. गप्पा-टप्पा झाल्या आणि दोघांनाही पटेल असा एक मुद्दा पुढे आला. आपण एक पत्रकार परिषद घेऊन या कादंबरीचे प्रकाशन जाहीर करावे. त्या निमित्ताने बातम्याही येतील आणि कादंबरीला थोडी आगाऊ प्रसिद्धी मिळेल.

"पण अजून आपण कादंबरीचे नाव ठरविले नाही. ते ठरवायला हवे." मी म्हणालो.

"ठरवूया !" तामणे म्हणाले. "मी विचार करतो." दोन दिवसांनी परत भेटायचे ठरवून आम्ही निरोप घेतला.

आता आम्ही दर दोन-चार दिवसांनी भेटत असू. पुढच्या वेळी मी गेल्यावर त्यांना म्हणालो, "काय ठरवलं का नाव?"

"निपुणगे, फार छान नाव सुचलंय. तुम्हालाही ते आवडेल."

"काय ते सांगा तरी !" मी म्हणालो.

"निर्मोही !" ते म्हणाले.

मला क्षणभर कळले नाही. पण या नावाचा अर्थ लक्षात आल्यावर मी म्हणालो, "छान आहे. अगदी योग्य. मला मान्य आहे."

मग याच विषयावर आमच्या खूप वेळ गप्पा झाल्या. पत्रकार परिषदेची तारीख ठरवूनच मी बाहेर पडलो.

डेक्कन जिमखान्यावरील एका हॉटेलात आम्ही पत्रकार परिषद घेतली. प्रा. तामणे यांनी कादंबरीच्या भूमिकेविषयी मजकूर तयार केला. तो आम्ही सायक्लोस्टाईल करून त्यांच्या १०० प्रती काढल्या. बरेच पत्रकार आले होते. आम्ही सर्वांना निमंत्रण दिले होते. यात महत्त्वाचे पत्रकार मला आज आठवतात ते म्हणजे, श्री. वसंतराव काणे आणि श्री. रामभाऊ जोशी.

दुसऱ्या दिवशी वृत्तपत्रांतून बऱ्यापैकी वातम्या आल्या. पत्रकार परिषदेनंतर त्या काळी बऱ्यापैकी वातम्या येत असत. त्यामुळे कादंबरीला, त्या कादंबरीच्या विषयाला बऱ्यापैकी प्रसिद्धी मिळाली.

यानंतर मी माझ्या दुसऱ्या कामांना लागलो आणि प्रभाकर तामणे या कादंबरीच्या आखणीला लागले.

आणि एक दिवस अचानक प्रा. तामणे यांचा फोन आला. "आज संध्याकाळी या. महत्त्वाचे काम आहे."

मी नेहेमीप्रमाणे संध्याकाळी गेलो. प्रा. तामणे गंभीर दिसले. मीही थोडा काळजीत पडलो. काय झाले असेल !

"निपुणगे, माडगूळकरांवरील ही कादंबरी मी लिहू शकत नाही."

"काहो, काय झालं?" मी सर्दच झालो.

"मी ही कादंबरी लिहू नये, अशी विद्याताईंची इच्छा आहे."

"कशावरून?"

"त्यांचे तसे पत्र मला आले आहे आणि बाहेरूनही तसं मला कळलं आहे."

"पण लेखक म्हणून तुम्हाला लिहिण्याचे स्वातंत्र्य आहेच की ! त्या असं कसं म्हणू शकतील?" मी म्हणालो.

"पण त्यांच्या इच्छेविरूद्ध मी ही कादंबरी लिहू इच्छित नाही. त्यात काहीच मजा नाही." प्रा. तामणे म्हणाले.

मी अगदी सुन्न झालो.

"आता आपण या कादंबरीवर बराच खर्च केला आहे. पत्रकार परिषद घेऊन जाहीरही केले आहे."

"त्याची तुम्ही काळजी करू नका. तो सर्व खर्च मी तुम्हाला देईन. तुम्ही मला आगाऊ दिलेली रक्कमही परत करीन. पण मी आता ही कादंबरी लिहिण्याचा विचार सोडून दिला आहे, हे नक्की."

यथावकाश आमचा करार रद्द झाला. मी आगाऊ दिलेली रक्कमही त्यांनी परत केली. पण आमची मैत्री कायम राहिली. वेळोवेळी मी त्यांच्याकडे जात राहिलो. त्यांचे एकही पुस्तक मी प्रकाशित केले नाही तरीही मी त्यांचा चांगला मित्र राहिलो.

मध्यंतरी ते अमेरिकेला मुलाकडे आणि त्यानंतर दुबईला मुलीकडे गेले होते. त्यामुळे आमची बरेच दिवसांत भेट नव्हती.

आणि अचानक त्यांच्या निधनाची बातमी आली. मी सुन्न झालो. वरील आठवणीबरोबरच प्रा. प्रभाकर तामणे यांच्याशी केलेल्या साहित्यिक गप्पांच्या अनेक आठवणी मनात घोळत राहिल्या.

त्यांच्या स्मृतीस विनम्र अभिवादन.

❑



अनुक्रमणिका

# य. दि. फडके यांची साहित्यदृष्टी आणि विचारसृष्टी



डॉ. न. म. जोशी

इतिहासाचार्य राजवाडे, सरदेसाई, शेजवलकर, वेंद्रे, खरे यांच्यासारख्या व्रतस्थ संशोधकांची परंपरा आता खंडित झाली आहे, असे वाटत असतानाच तीस-पस्तीस वर्षांपूर्वी या परंपरेत शोभावे असे एक नाव नव्याने ऐकू येऊ लागले. ते म्हणजे य. दि. फडके. खरं तर फडके त्याहीपूर्वी लेखन करीत होते. पण अभिजन वाचकांच्या लक्षात फडके राहू लागले ते त्यांच्या संयुक्त महाराष्ट्रासंबंधी त्यांनी केलेल्या लेखनामुळे आणि भाषणांमुळे. बालपणी सोलापुरात साहित्यिकांच्या स्वाक्षऱ्या जमविण्याचा छंद जोपासणारे य. दि. फडके आपल्या अथक परिश्रमशील संशोधनकार्याची वाट चालत चालत वेळगावच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष झाले आणि अनेकांना त्यांची स्वाक्षरी अक्षर वाटू लागली. य. दि. फडके यांच्या या साहित्य प्रवासाचा शोध घेतला तर असं दिसतं की व्यवसायानं राज्यशास्त्राचे प्राध्यापक असलेले फडके हे रसिक मनाचे बुद्धिनिष्ठ संशोधक आहेत. हा वदतोव्याघात वाटेल; पण फडके यांचं साहित्य वाचल्यानंतर याची साक्ष पटते आणि मग फडके यांच्या साहित्यदृष्टीविषयी किंवा त्यांच्या विचारसृष्टीविषयी कोणतीही शंका मनात उरलेली नसते. एखाद्या घटनाप्रसंगाचा, साहित्यकृतीचा अनुभव व आस्वाद घेताना ते पूर्णपणे भावनाशील वृत्तीने समरसून घेतात, परंतु त्याच वेळी त्याच घटना प्रसंगांचे संश्लेषण, विश्लेषण किंवा त्या बावत निष्कर्ष काढताना त्यांच्यातील तटस्थ समीक्षक, तर्कशुद्धतेने विचार करणारा संशोधक जागृत असतो. फडके यांच्या साहित्याच्या परिशीलनानंतर हा मुद्दा अधिक स्पष्ट होईल.

## संशोधनाचे असिधारा व्रत

कोणत्याही क्षेत्रातील संशोधन हे जीवनातील इतर कोणत्याही कामांपेक्षा वेगळ्या पद्धतीचे असते. संशोधन हे एक व्रत असते. परिश्रम, सातत्य, चिकाटी यांची आवश्यकता असते. संशोधनामुळे संशोधकाला भौतिक व व्यावहारिक स्वरूपात फळ मिळतेच असे नाही. शिवाय संशोधनासाठी लागणाऱ्या सामग्रीची योजना, अर्थव्यवस्था यांचीही सतत चिंता असते. संशोधन हे असिधारा व्रत असते.

राजवाडे यांचेच उद्‌गार डॉ. फडके यांनी उद्‌धृत केले आहेत. त्यावरून संशोधकाची स्थिती स्पष्ट होते. राजवाडे म्हणतात, 'मला काय पाहिजे? निवांत घर, द्रव्य, अन्न, म्हणजे समाजशास्त्र व इतिहास हे ग्रंथ लिहिता येतील. या देशात अशा सोयीच नाहीत. राजवाड्यांना स्वत:चे घर, पुरेसे द्रव्य कधी मिळालेच नाही. द्रव्याभावी अस्सल साधनांच्या नकला तयार करण्याच्या आणि त्या छापून घेण्याच्या कामात अडचणी येत असत. संशोधन करू पाहणाऱ्यांना राजवाडे यांनी सांगितले आहे-



अनुक्रमणिका






## डॉ. य. दि. फडके यांची साहित्यसंपदा

व्यक्ती आणि विचार : नाही चिरा नाही पणती.

लोकमान्य टिळक आणि क्रांतिकारक : शोध सावरकरांचा : शाहू छत्रपती आणि लोकमान्य : व्यक्तिरेखा : केशवराव जेधे : शोधता शोधता : आंबेडकरी चळवळ : अण्णासाहेब लठ्ठे दृष्टादृष्ट : शोध बाळगोपाळांचा : विसाव्या शतकातील महाराष्ट्र (खंड १ ते ५

कहाणी नेताजींची (खंड १ व २) - सर्व श्रीविद्या प्रकाशने.

नथुरामायण (अक्षर प्रकाशन) : र. धों. कर्वे (ह. वि. मोटे प्रकाशन)

स्वातंत्र्य चळवळीतील शीख (समता आंदोलन प्रकाशन, ठाणे)

अक्षर दिवाळी (१९८०, १९८१, १९८२) : सहकार्याने संपादन, विश्वकर्मा साहित्यालय, पुणे

आधुनिक वनत असलेल्या राष्ट्रातील स्वराज्यशासन (रोलंड पेनॉक यांच्या ग्रंथाचा अनुवाद) डॉ. आंबेडकर आणि काळाराम मंदिर सत्यागृह (म. फुले समता प्रतिष्ठान, पुणे)

केतकर लेखसंग्रह, (संपादन) : साहित्य अकादमी, दिल्ली

तत्त्वज्ञ सावरकर, (संपादन) तत्त्वज्ञान महाकोश मंडळ व कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे.

दिनकरराव जवळकर समग्र वाङ्मय, (संपादन) म. फुले समता प्रतिष्ठान, पुणे

राखीव जागा : वस्तुस्थिती म. फुले समता प्रतिष्ठान, पुणे

विष्णुशास्त्री चिपळुणकर : नॅशनल वुक ट्रस्ट, दिल्ली

वीस लाखांचे जवाहिर : रम्यकथा प्रकाशन, पुणे

नागरिकशास्त्र (पाठ्यपुस्तक) संयुक्त साहित्य, पुणे

स्वातंत्र्य आंदोलनातील मुसलमान (समता आंदोलन, ठाणे)

भारत काल आणि आज (पाठ्यपुस्तक), मुंबई विद्यापीठ

Portrit of a resolutionary : Senapatı Bapat

(Senapati Bapat Centenary Celebration Samiti, Mumbai)

'मानवी बोटांनी काम करण्याला काहीतरी मर्यादा आहेच आहे. ओली किंवा कोरडी भिक्षा म्हणून मागून इतिहाससाधन व इतिहाससंशोधनाचे काम करावे; कनक व कांता यांचा मोह टाळावा; संशोधनाचे काम नाजूक तितकेच श्रमाचे असते.' (विसाव्या शतकातील महाराष्ट्र, य. दि. फडके : खंड ५, पृष्ठ १०)

डॉ. य. दि. फडके यांनाही थोड्याफार फरकाने संशोधनावावत राजवाडे यांच्यासारखाच अडचणीचा मार्ग चालावा लागला. स्वातंत्र्यपूर्व काळातील इंग्रज राज्यकर्त्यांच्या दप्तरातील अस्सल व अप्रकाशित कागदपत्रांचा आधार महाराष्ट्राचा इतिहास लिहिताना फडके यांनी



अनुक्रमणिका

घेतलेला आहे. संशोधनासाठी कोणत्याही प्रकारचे अनुदान न मागता संशोधन केल्यामुळे (अपवाद : महाराष्ट्र फौंडेशनचा पुरस्कार) फडके यांना अशा असंख्य कागदपत्रांचा नकला स्वत:च्या हातांनी कराव्या लागल्या. कारण छायाप्रती करून घेणे किंवा टंकलेखन करवून घेणे त्या काळी त्यांना परवडण्यासारखे नव्हते. राजवाड्यांच्या बोटांवावतच्या इशाऱ्याचा फडके यांनाही प्रत्यय आलाच होता. फडके यांनी संशोधनाच्या त्या असिधारा व्रताची तीन तपांहून अधिक काळ उपासना केली.

## संशोधन आणि इतरांच्या भूमिका

'देश स्वतंत्र होऊन त्रेपन्न वर्षे झाली. पण आजही स्वातंत्र्यपूर्व काळातील सरकारच्या दप्तरातील अस्सल कागदपत्रे संशोधकांना खुले करून देण्यास नोकरशहा खळखळ करीत असतात. सत्तेवर असलेल्या राजकीय पक्षांच्या नेत्यांनाही खरोखरीच भूतकाळात काय घडले हे जाणून घेण्याची इच्छा नसते. तशीच त्यासाठी लागणारी सवडही नसते. त्यांच्या मनात रुज़लेल्या नेत्यांच्या प्रतिमांना ज्यामुळे धक्का बसेल असे संशोधन व लेखन त्यांना मुळातच नको असते आणि कोणी केले तरी त्यांना ते नकोसे होते. नेत्यांप्रमाणेच सर्वसामान्य माणसांनाही सत्यापेक्षा मिथके फार प्रिय असतात. अलीकडच्या काळात तर कोणाच्या भावना केव्हा दुखावतील याचा नेम राहिलेला नाही. धार्मिक, भाषिक, प्रादेशिक आणि जातीय दुराभिमानाच्या आहारी जाऊन संशोधक लेखकांची मुस्कटदावी करणाऱ्यांचे-प्रस्थापितांचे तंत्र बरेच विकसित झाले आहे.

### प्रस्तावना

डॉ. फडके यांनी आपल्या ग्रंथांना ज्या प्रस्तावना लिहिल्या आहेत त्यांचे परिशीलन केले तरी 'गागर मे सागर' या स्वरूपात त्यांची विचारसृष्टी कशी आहे याची कल्पना येते.

'आंबेडकरी चळवळ' या ग्रंथाच्या प्रास्ताविकात डॉ. फडके लिहितात 'दुर्दैवाने भारतीयांच्या हाडीमाशी खिळलेल्या विभूती पूजेच्या प्रवृत्तीचा प्रसाद डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनाही मिळाल्याशिवाय राहिला नाही. त्यांच्या मृत्यूनंतर नागपूरच्या दीक्षाभूमीला आणि दादर चौपाटीवरच्या दहनभूमीला तीर्थक्षेत्रांचे रूप प्राप्त झाले. तेथे दरवर्षी लाखो लोकांच्या जत्रा भरू लागल्या. भक्तिभावाने चरित्रे लिहिण्यात आली. कादंबरीकारांनी, नाटकारांनी आणि कवींनी आपल्या कल्पनाशक्तीच्या साहाय्याने बाबासाहेबांच्या 'मिथ'मध्ये इतके रंग बेमालूमपणे मिसळले की आता फक्त त्यांच्यासंबंधी 'पांडवप्रताप' किंवा 'भक्तिलीलामृत' सारख्या पोथ्या तेवढ्या लिहायच्या राहिल्या आहेत. बाबासाहेब आज हयात असते तर माझ्या भक्तांपासून माझे संरक्षण करा अशी प्रार्थना त्यांना करावी लागली असती.' (पृ. क्र. ५)

विभूतिपूजक समाजाची ही भक्तिप्रबल पण तत्त्वाला हरताळ फासणारी भूमिका डॉ. फडके यांनी नेमक्या शब्दांत आणि सप्रमाण व्यक्त केली आहे. १९४३ च्या एप्रिलमध्ये ५१व्या वाढदिवसानिमित्त भरलेल्या सत्कारसभेत डॉ. आंबेडकर उपस्थित राहिले आणि त्यांनी स्वच्छ सांगितले की 'नेत्याविषयी अपार भक्ती बाळगली की जनतेचा आत्मविश्वास नाहीसा होतो.

मुक्तीसाठी कोणत्याही एका व्यक्तीवर अवलंबून राहू नका. तुमची मुक्ती तुमच्याच हातात आहे. आणि ती तुम्हीच प्रयत्न करून मिळविली पाहिजे.'

'केशवराव जेधे' या ग्रंथाच्या निवेदनात डॉ. फडके लिहितात,

'चरित्रकार चरित्रविषय झालेल्या व्यक्तीची स्तुतिस्तोत्रे गाणार असेल तर त्याला प्रतिसाद चांगला मिळतो. मात्र चरित्रविषय झालेल्या व्यक्तीचे गुणदोष तटस्थपणे दाखविण्याचा प्रयत्न एखाद्या चरित्रकाराने केला तर त्याच्यावर दोषारोप केले जातात. त्याची जात शोधली जाते व त्यावरून चरित्राबद्दल मते बनविली जातात. अशा वातावरणात केशवराव जेधे यांचे राजकीय चरित्र लिहिण्याचा उद्योग जिकिरीचा होता आणि तरी तो करावयाचे मी ठरविले' संशोधकाला कोणत्या समस्यांना तोंड द्यावे लागते यावर यातून बराच प्रकाश पडतो.

र. धों. कर्वे या पुस्तकाच्या प्रस्तावनेत य. दि. फडके लिहितात -

'प्रत्येक माणसाचे आयुष्य हे कोड्यासारखे असते. त्याच्या हयातीतही त्याच्या अगदी जवळच्या माणसांना हे कोडे उलगडलेले असते असे नाही. त्यामुळे एका व्यक्तीच्या आयुष्यातील घटनांचे साक्षीदारही त्याच्या कृतींची वेगवेगळी स्पष्टीकरणे देत असतात. खेरीज माणसे सतत तऱ्हेतऱ्हेचे मुखवटे घालून हिंडत असतात. त्यामुळे त्या मुखवट्याआड दडलेल्या माणसाचे खरे रंगरूप शोधणे अवघड होते. माणसाच्या मनाचा अनेकदा थांग लागत नाही. त्याच्या कृतींचा अर्थ कळत नाही. अशा स्थितीत काही वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या एखाद्या माणसाची जीवनकथा लिहिणे हे अवघड असते.'

र. धों. कर्वे हे त्या काळात प्रवाहाविरुद्ध पोहणारे समाजसुधारक होते. लोकसंख्येच्या विस्फोटाबद्दल आज सर्वत्र जे तळमळीने बोलले जाते ती तळमळ र. धों. कर्वे यांना साठ-सत्तर वर्षांपूर्वीच लागलेली होती आणि विरोधकांचे आसुड सहन करीतच त्यांनी त्याकाळी समाजस्वास्थ्य चालविले. र.धों. कर्वे यांचेही आयुष्य एका कोड्यासारखे होते. न उलगडलेले कोडे. हे कोडे काही प्रमाणात तरी उलगडून दाखविण्याचे कर्म फडके यांनी र. धों. कर्वे यांचे चरित्र लिहून केलेले आहे.

नथुरामायण या पुस्तकाच्या प्रास्ताविकात भारताच्या वर्तमान राजकीय, सामाजिक स्थितीचे मर्मभेदक वास्तव चित्रण डॉ. फडके करतात. रोकड्या शब्दांत सद्यस्थितीचे समालोचन करताना फडके लिहितात 'राजकारणाचे गुन्हेगारीकरण आणि गुन्ह्याचे राजकीयीकरण या दोन्ही प्रक्रिया गतिमान झाल्यानंतर गेल्या पंधरावीस वर्षांत सत्तेच्या राजकारणात गुन्हेगारांचे प्रस्थ वाढले आणि अपराध्यांचे स्तोम माजविण्यास सुरुवात झाली. धार्मिक मूलतत्त्ववादी तसेच आक्रमक राष्ट्रवादी राजकीय दहशतवादाचा अवलंब करू लागले. त्यामुळे हजारो नि:शस्त्र निरपराध स्त्री-पुरुष ईशान्य भारतात, पंजाबात तसचे जम्मू काश्मीरमध्ये मारले गेले. भ्रष्टाचार-तस्करी हे आरोप ज्यांच्यावर करण्यात आले ते नेते आणि त्यांचे निष्ठावंत चेले पांढरीशुभ्र दिव्य, भगवी वस्त्रे चढवून देशभर वावरताना दिसू लागले. तर काहीजण हिरवे झेंडे फडकवताना दिसतात. राजकारणाचा धंदा आणि धंद्याचे राजकारण सध्या तेजीत चालले आहे.'

**नरसिंह महादेव जोशी**

एम्. ए., एम्. एड्., पीएच्. डी.
१०१३, सदाशिव पेठ, गंधाली अपार्टमेंट्स्, नागनाथ पार रस्ता, पुणे ४११ ०३०.
दूरध्वनी : ४४७६८६८



जन्म : ११।१।१९३६

२१ वर्षे शिक्षक, पर्यवेक्षक, नू. म. वि. प्रशाला, पुणे व अन्य संस्था.
१९ वर्षे शिक्षणशास्त्राचे प्राध्यापक, टिळक शिक्षण महाविद्यालय, पुणे.
३५ पुस्तके प्रसिद्ध. कथा, कादंबरी, चरित्र, एकांकिका, बालसाहित्य, स्फुट, वैचारिक लेख. निःस्पृह, प्रेषित या कादंबऱ्यांना विशेष मान्यता.
तरुण भारत, पुणे या वृत्तपत्रात 'भ्रमंती' आणि 'नमगोष्टी' या सदरांचे नियमित लेखन.
'एकता' या मासिकाच्या अनेक विशेषांकाचे संपादन. विशेषतः 'सिंधी समाज व संस्कृती', 'शाहीर' हे विशेषांक संपादित. 'महाराष्ट्र साहित्य पत्रिका' या साहित्य परिषदेच्या पत्रिकेचे संपादन.
विविध संस्थांच्या अनेक स्मरणिकांचे संपादन.
'चित्तपावन शांडिल्य गोत्री जोशी कुलवृत्तांत' या १४५६ पानांच्या विस्तृत ग्रंथाचे संपादन व त्याला संशोधनात्मक प्रस्तावना.
पुणे नगरपालिकेचे पहिले मुख्याधिकारी व एक प्रयोगशील विचारवंत कै. शं. रा. भागवत यांच्या राजगड प्रयोगाविषयी स्मरणिकेचे संपादन. शालेय व महाविद्यालयीन नियतकालिकांचे संपादन.
माजी कार्यवाह, महाराष्ट्र साहित्य परिषद, माजी कोषाध्यक्ष, मराठी साहित्य महामंडळ
पुरस्कार : महाराष्ट्र शासनाचा दोन वेळा उत्कृष्ट वाङ्मयनिर्मिती पुरस्कार.
१९६५ : बालसाहित्य, १९८७ : डॉ. बाबासाहेब आंबेडकर चरित्र व कार्य.
अखिल भारतीय गोसंरक्षक मंडळी, मुंबई या संस्थेच्या शताब्दीनिमित्त 'Cow's milk better, next to mother's milk' या विषयावरील अ. भा. निबंधस्पर्धेत इंग्रजी भाषेतील निबंधाला राष्ट्रपती डॉ. शंकरदयाळ शर्मा यांच्या हस्ते पारितोषिक.
१९९७ : जनगोष्टी (पर्यावरणकथा) : किर्लोस्कर फाऊंडेशन पुरस्कार.
१९९७ : नमगोष्टी (भारतकथा) : रेणुका विद्या प्रतिष्ठान पुरस्कार.
पत्रकारांचा शिक्षणविचार या पुस्तकाला म. सा. प.चा शि. म. परांजपे पुरस्कार. सार्वजनिक वाचनालय नाशिक यांचा ग. वि. अकोलकर पुरस्कार.
मूल्यकथा या पुस्तकाला रा. गो. शेवडे पुरस्कार.



अनुक्रमणिका

सद्यस्थितीचे इतके परखड विवेचन, कोणाचाही मुलाहिजा न ठेवता, वैचारिक विश्वात क्वचितच केले जाते. म. फुले, राजर्षी शाहू महाराज, डॉ. आंबेडकर, केशवराव जेधे इ. विषयांसंबंधी सखोल व साधार लेखन करणारे डॉ. फडके सत्यशोधक व ब्राह्मणेतर चळवळीचा साधार इतिहास लिहिण्यासाठी साधनांची जमवाजवम करू लागले तेव्हा त्यांनीही मनात असा विचार केला की 'म. फुले, डॉ. आंबेडकर, राजर्षी शाहू महाराज यांच्यासारख्या उपेक्षित महापुरुषांचे महत्त्व अलीकडच्या काळात अनेकांना समजू लागले आहे ही स्वागतार्ह घटना असली तरी त्याचबरोबर झपाट्याने झालेल्या त्यांच्या दैवतीकरणामुळे त्यांनी निष्ठापूर्वक जपलेल्या त्यांच्या मूल्यांच्या वाढीसच धोका पोचण्याचा संभव आहे हे लक्षात घ्यायला हवे. (व्यक्ती आणि विचार : प्रास्ताविक) व्यक्तिरेखा या पुस्तकाला मात्र डॉ. फडके यांनी प्रास्ताविक लिहिलेले नाही. अलीकडच्या बाकी बहुतेक सर्व पुस्तकांना त्यांनी प्रास्ताविक लिहिले त्यांतून लेखनविषयक भूमिका स्पष्ट होते.

'लोकमान्य टिळक आणि क्रांतिकारक' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत (पृ. १२) इतिहासकार व चरित्रकार यांची वलस्थाने कोणती व त्यांच्या मर्यादा कोणत्या यावर नेमका प्रकाश टाकताना डॉ. फडके लिहितात-

'विख्यात इतिहासकार व चरित्रकार ए. जे. पी. टेलर म्हणतात त्याप्रमाणे प्रत्येक इतिहासकारात एक चरित्रकार दडलेला असतो, पण इतिहासकार आणि चरित्रकार यांचे लक्ष्य निराळे असते. आपल्या परीने इतिहास घडविणारा माणूस हा चरित्राच्या केंद्रस्थानी असतो तर अनेक माणसांनी एकत्र येऊन चालविलेली चळवळ किंवा कृती हे इतिहासकाराचे लक्ष्य असते. इतिहासकारापेक्षा चरित्रकाराला कल्पनाशक्तीवर जास्त विसंबून राहावे लागते. इतिहासकाराजवळही प्रतिभा या नावाने ओळखले जाणारे कल्पकतेचे देणे असावे लागते. पण इतिहासकाराच्या प्रतिभाविलासाला जात्याच काही मर्यादा असतात. कल्पनाशक्तीला चौकट उधळू न देता भरभक्कम पुराव्यानिशी त्या घडामोडींचा अन्वयार्थ लावावा लागतो आणि आपले निष्कर्ष नोंदवावे लागतात. काही वेळा इतिहासकाराला अनुमानांवर भिस्त ठेवावी लागते. तरी ती अनुमाने चुकीची ठरण्याची शक्यता त्याला नाकारता येत नाही.

'शोध सावरकरांचा' या ग्रंथाच्या प्रस्तावनेत सावरकर चरित्राचा सखोल शोध घेताना हाती जे जे लागले ते स्पष्टपणे फडके यांनी सांगून टाकले आहे. सावरकरांच्या थोरवीबद्दल त्यांनाही आदर आहेच पण त्यांच्या पुसटत्या पराक्रमाचे पराक्रमपर्व म्हणून जे चरित्रकारांनी रंगवले त्याबाबत खुद्द सावरकरांच्या शब्दांचा हवाला देऊनच फडके भाष्य करतात. मार्सेलिसच्या समुद्रातील त्यांची त्रिखंडात गाजलेली उडी ही उडी होती. पण ज्या तऱ्हेने चरित्रकारांनी रंगवली तशी ती नव्हती हे सांगताना फडके लिहितात -

'राजापेक्षा जास्त राजनिष्ठ असणारी माणसे सरळ सरळ वस्तुस्थितीकडे कानाडोळा करतात तसेच तात्यांच्या चरित्रकारांचे व भक्तांचे या त्रिखंडात गाजलेल्या उडीचे वर्णन करताना होते असे दृश्य आजही दिसते' हे लिहिताना फडके यांना मूर्तिभंजन करायचे नसते तर सत्यशोधन

करायचे असते अशी त्यांची भूमिका आहे.

**विसाव्या शतकातील महाराष्ट्र**

विसाव्या शतकातील महाराष्ट्रासंबंधी आतापर्यंत प्रसिद्ध झालेले पंचखंड भविष्यात येऊ घातलेले खंड य.दि. फडके यांचे महत्त्वाचे ऐतिहासिक कार्य आहे. १९०१ ते १९१४ खंड १, १९१४ ते १९२० खंड २, १९२१ ते १९२९ खंड तीन, १९३० ते १९३९ खंड ४, १९४० ते १९४७ खंड ५ असे पाच खंड म्हणजे स्वातंत्र्यपूर्व अर्धशतकाच्या महाराष्ट्राचा राजकीय इतिहास आहे. सुमारे १८६२ डेमी पृष्ठांच्या या पंचखंडात्मक राजकीय इतिहासामध्ये डॉ. फडके यांनी जागतिक मंदी आणि महायुद्ध, कायदेमंडळाच्या निवडणुका आणि काँग्रेस पक्ष. जातीय दंगली व पक्ष संघटना, ब्राह्मण, ब्राह्मणेतर चळवळी, संस्थानी प्रजेच्या चळवळी, निजामाच्या प्रजेचा लढा, दलित मुक्ती आंदोलन यांचा परामर्श घेतला आहे. एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्राच्या पार्श्वभूमीवर महाराष्ट्राचे राजकीय चित्र कसे आहे याचा आढावा घेताना इंग्रजांविरुद्धच्या सनदशीर चळवळी, सशस्त्र चळवळ, समांतर राजकीय चळवळी, कारखान्यातील प्रतिसरकार यांचाही अभ्यासपूर्ण परामर्श डॉ. फडके यांनी घेतला आहे. असंख्य कागदपत्रांच्या आधारे त्यांनी मांडलेला हा राजकीय इतिहासाचा पट नुसता माहितीपूर्ण नाही तर विवेचक आहे. आणि या विवेचनाच्या ओघात डॉ. फडके यांचे जे निष्कर्षात्मक भाष्य आहे तेही या काळखंडाचे राजकीय क्ष किरण चित्र स्पष्ट करणारे आहे. हे खंड म्हणजे संदर्भग्रंथ तर आहेतच पण सर्वसामान्य वाचकांनाही प्रवाही भाषाशैलीपुढे ते वाचनीय तसेच प्रबोधक वाटतील. महाराष्ट्राचा राजकीय इतिहासाचा आधारपूर्व दस्तऐवज या नात्याने या ग्रंथांचे स्थान महत्त्वाचे आहे.

**शोध : सावरकरांचा आणि बाळगोपाळांचा**

लोकमान्य टिळक आणि आगरकर यांच्या संबंधांबाबत किंवा त्यांच्या चारित्र्यकार्याबाबत चरित्रात्मक अथवा विवेचक लेखन आतापर्यंत मोठ्या प्रमाणावर झाले आहे. डॉ. फडके यांनी वेळोवेळी लिहिलेल्या लेखांचे संकलन शोध बाळगोपाळांचा या पुस्तकात आहे. टिळक व डेक्कन एज्युकेशन सोसायटी या लेखात डेक्कन एज्युकेशन सोसायटीची असंख्य कागदपत्रे चाळून फडके यांनी टिळक, सोसायटीचे इतर सभासद त्यांची मतमतांतरे, त्यांच्यातील संघर्ष, या संघर्षाची वरवर दिसणारी कारणे आणि प्रत्यक्षातील द्वेष-मत्सरासारखी सुप्त कारणे याबाबत साधार विवेचन करण्याचा प्रयत्न केला आहे. या पुस्तकातील रखमाबाईची कहाणी हा लेख शोध बाळगोपाळांचा या शीर्षकाच्या पुस्तकात रखमाईसंबंधी बाळगोपाळांची मते काय होती हे जाणण्याकरता लिहिला आहे की रखमाबाईची चरित्र-कहाणी लिहिण्यासाठी लिहिला आहे असा प्रश्न उभा राहतो. शीर्षकास अनुलक्षून या मुद्द्याला जे वजन प्राप्त व्हायला हवे होते तसे ते झालेले नाही असं लेखाच्या वाचनानंतर जाणवते. स्वतंत्र लेख म्हणून हा लेख कितीही चांगला असला तरी या पुस्तकात तो कसा शोभतो असा प्रश्न उभा राहतो. रखमाबाईंच्या कहाणीच्या आधाराने बाळगोपाळांचा शोध घेण्याची प्रक्रिया या मुद्द्यावर अधिक भर हवा

होता.

शोध सावरकरांचा या पुस्तकात शेवटचे वाक्य असे आहे की 'सावरकर साहित्य किंवा सावरकर बंधूंबद्दलचे साहित्य नुसते वाचून तसेच त्यांनी आपल्या कृतीचा सांगितलेला अर्थ अगर इतरांनी त्यांच्या जीवनाचा लावलेला अर्थ यावर विसंबून भागत नाही; चालत नाही. प्रत्येक अभ्यासकाला आपल्या परीने सावरकरांचा शोध घ्यावाच लागतो. डॉ. फडके यांनी याच भूमिकेतून शोध सावरकरांचा हे पुस्तक लिहिले आहे. सावरकरांबद्दल सर्वज्ञात असलेल्या घटनांचे 'आपल्या परीने' साधार विवेचन तर डॉ. फडके यांनी केले आहेच पण याहून अधिक महत्त्वाची गोष्ट की सर्वसामान्य जिज्ञासूंच्या मनात जे जे छोटे प्रश्न उभे राहतात त्यांची साधार उत्तरे या ठिकाणी दिली आहेत. उदा. पुणे, मुंबई अथवा सावरकरांना प्रिय असणारे नाशिक या ठिकाणांव्यतिरिक्त सावरकर स्थानबद्धतेच्या प्रदीर्घ कालखंडात रत्नागिरीलाच का राहिले? रत्नागिरीची निवड त्यांनी केली की त्यांना ती करावी लागली. याबद्दलची जिज्ञासातृप्ती पृ. ६०-६१ वरील मजकुराने होते. सावरकरांच्या जीवनातील १९०६ नंतरच्या घटनाक्रमावर आधारित १९४० पर्यंतच्या कालखंडासंबंधी फडके यांनी चर्चा केली आहे. लंडन ते नाशिक, रत्नागिरी आणि नंतर ज्या ज्या ठिकाणी सावरकरांचा संबंध आला तेथील घडामोडींचा ऊहापोह या पुस्तकात केला आहे.

**कहाणी नेताजींची**

अनुक्रमे ४८० व ४२२ पृष्ठांचे सुभाषचंद्र बोस यांचे द्विखंडात्मक चरित्र लिहून य.दि.फडके यांनी आपल्या ग्रंथसंपदेत मोलाची भर घातली आहे. फडके यांनी प्रास्ताविकात स्वत:च नमूद केले आहे.

'मी काढले आहे ते सुभाषचंद्रांचे छायाचित्र नसून तैलचित्र आहे. ते रंगवताना अनेकांकडून उधार घेतलेले रंग त्यांचा नामनिर्देश करून मी माझ्या कुवतीप्रमाणे ते मिसळण्याचा प्रयत्न केला आहे. खुद्द नेताजींनी 'एक भारतीय यात्रेकरू' आणि 'भारतातील लढा' १९२०-४२ या शीर्षकाची आत्मकथनात्मक पुस्तके लिहून स्वत:ची प्रतिमा रेखाटली आहे. ती तर मी रंगवलेल्या तैलचित्राचा मूलाधार आहे. राजकारण हा फडके यांचा अध्ययन अध्यापनाचा व चिंतनाचा विषय असल्याने स्वाभाविकपणेच कोणतेही चरित्र लिहिताना चरित्रनायकाचे सरधोपट चरित्र सांगून ते मोकळे होत नाहीत तर अशा चरित्रनायकांच्या, विशेषत: राजकीय क्षेत्रातील जीवनातील घडामोडींचा, त्यांच्या निर्णयांचा, परिणामांचा राजकीय अन्वयार्थ लावून ते चरित्रनायकाचे चरित्र लिहितात. 'कहाणी सुभाषचंद्रांची' हे चरित्रही याच अंगाने लिहिलेले आहे. डॉ. फडके यांचे जे इतर ग्रंथ आहेत. त्यांच्या तुलनेने या चरित्रात डॉ. फडके यांच्यातील चरित्रनायकाविषयीचा आदरभाव अधिक प्रमाणात व्यक्त होतो. याचा अर्थ इतर चरित्रनायकांबद्दल त्यांना आदर नव्हता असे मुळीच नाही. पण इतर चरित्रे लिहिताना केवळ आदरभावापेक्षा चिकित्साभाव अधिक प्रमाणात आहे. या चरित्रात मात्र चिकित्साभावापेक्षा आदरभाव अधिक प्रमाणात आहे एवढाच या मुद्द्याचा अर्थ. याबाबत आपल्याला शीर्षकापासून

विचार करता येईल. शोध बाळगोपाळांचा, शोध सावरकरांचा अशी अन्य ग्रंथांची शीर्षके आहेत. या चरित्रालाही शोध सुभाषचंद्रांचा असे शीर्षक देता आले असते. पण ही कहाणी सुभाषचंद्रांची आहे आणि जरी ही कहाणी पूर्णपणे ऐतिहासिक घटनांवर आधारित असली तरी तिची मांडणी शोधनिबंधापेक्षा कहाणीच्या अंगानेच झालेली आहे हे या ग्रंथाचे वैशिष्ट्य होय.

**व्यक्तिरेखा आणि दृष्टादृष्ट**

व्यक्तिरेखा आणि दृष्टादृष्ट हे दोन व्यक्तिरेखांचे संग्रह आणि 'नाही चिरा नाही पणती' हा व्यक्तिरेखनाच्या शैलीनेच स्वातंत्र्यलढ्यातील स्त्रियांच्या चरित्रांचा संग्रह ही तीन पुस्तके डॉ. य. दि. फडके यांच्या अन्य ग्रंथसंपदेमध्ये आपल्या वेगळ्या वैशिष्ट्याने उठून दिसतात.

दृष्टादृष्टमध्ये मोगूबाई कुर्डीकर, वि. स. खांडेकर, आचार्य अत्रे, बेगम अख्तर, न. र. फाटक व पोतदार, हरिभाऊ मोटे, डॉ. सातवळेकर, गं. बा. सरदार, महाकवी बेंद्रे, बॉबी तल्यारखान, सुनीती चौधरी, लोकमान्यांचे चिरंजीव, दोन तात्या (सावरकर व बापट) चार्ली चॅप्लिन, बाबूराव पेंटर आणि डॉ. आंबेडकर अशा व्यक्तिरेखा चितारलेल्या आहेत. यातील बऱ्याच व्यक्तिरेखा परिचयाच्या असल्या आणि आधीच त्यांच्यासंबंधी बरेच लिहिले गेले असले तरी त्याही व्यक्तिरेखा फडके यांना जशा दिसल्या तशा रंगविल्यामुळे वैशिष्ट्यपूर्ण झाल्या आहेत. या संग्रहातील डॉ. सातवळेकर यांची व्यक्तिरेखा तशी एरवी अपरिचित पण एक वैशिष्ट्यपूर्ण नमुना आहे. हैद्राबादच्या विवेकवर्धिनी कॉलेजचे प्राचार्य असलेले डॉ. सातवळेकर हे ख्यातनाम पंडित श्री. दा. सातवळेकर यांचे धाकटे बंधू, खुर्चीवर प्राचार्य पण खुर्चीबाहेर एक रसिक व्यक्ती व चांगला मित्र म्हणून वागणाऱ्या सातवळेकरांची जीवनशैली मोकळीढाकळी व प्रसन्न होती हे जागोजागी या लेखातून जाणवते. मोठ्या व्यक्तींबरोबर जन्मामुळे वा अन्य काही कारणांमुळे ज्या व्यक्तींची नावे जोडली जातात त्यांच्या जीवनशैलीबाबत इतरांच्या काही विशिष्ट कल्पना असतात. पण प्रत्येकाची जीवनशैली वेगळी असणार हे आपण अशा वेळी मानलेले नसते. डॉ. सातवळेकर यांच्याबाबत असेच आहे. सत्तरी ओलांडलेले डॉ. सातवळेकर मनानं तरुण होते. तरुणपणी वज्रहनुमान वस्ताद म्हणून ओळखले जाणारे सातवळेकर, व्यसनीपणा आणि निर्व्यसनीपणा याबद्दल जे भाष्य करतात ते वाचण्यासारखं आहे. मद्यप्राशन, मांसाशन, धूम्रपान या सर्व तथाकथित व्यसनांना जवळ करणारे सातवळेकर म्हणतात, 'सात्त्विक समजले जाणारे छंद ही व्यसनंच आहेत. तासन्‌तास क्रिकेटचे सामने बघणं, रोज भलभलत्या विषयांवरची पुस्तकं वाचणं, ही व्यसनंच. ज्या ज्या गोष्टीमुळे आनंद मिळतो ती ती गोष्ट मिळाल्याशिवाय माणसाला चैन पडत नाही. व्यसन म्हणजे तरी दुसरं काय? असं चैन न पडणं आणि मिळाल्यावर आनंद होणं' व्यसनाबाबतच्या हा सिद्धान्त व्यसनकल्पनेला छेद देणारा आहे.

लोकमान्य टिळकांचे चिरंजीव श्रीधरपंत यांचा जीवनशोध घेताना त्यांच्या जीवनाचे उपेक्षित पैलू डॉ. फडके यांनी विशद केले आहेत. सत्यशोधकांच्या समता आंदोलनाशी व दलितमुक्ती चळवळीशी स्वातंत्र्यलढ्याचा सांधा जोडण्याचा प्रयत्न आपल्या परीने श्रीधरपंतांनी चालविला

होता हे डॉ. फडके यांनी लिहिले आहे. श्रीधरपंतांनी आत्महत्या केली. एवढाच त्यांच्या चरित्रातील भाग सर्वसामान्यांना माहीत आहे. पण त्यांच्या जीवनाला या सामाजिक जाणिवेची रुपेरी किनार आहे हे या लेखातूनच कळते.

व्यक्तिरेखा या पुस्तकात 'अनुअक्का' हे अत्यंत हृद्य व्यक्तिचित्र डॉ. फडके यांनी रेखाटले आहे. आजी देवाचं नाव कितीही घेत असली तरी देवानं तिला सुख कधीच दिलेलं नाही हे परखड सत्य फडके या लेखात सांगतात. विद्या मिळविण्यासाठी खस्ता खाणाऱ्यांचे तिला कौतुक असे, ती स्वत: निरक्षर असूनही, हे आजीचं विद्याप्रेम डॉ. फडके सांगतात तेव्हा जुन्या काळातल्या 'आलवणांची' आठवण होते. आपल्या या हृद्य लेखाचा शेवटही डॉ. फडके आजीच्या भूपाळीनंच करतात. कारण अनेक वर्षं झाली तरी ती भूपाळी त्यांच्या कानात रुंजी घालत असते.

'अमुचा प्याला दु:खाचा' हा असाच एक अत्यंत हृद्य लेख आहे. दिनकर श्रीपाद फडके यांच्यासंबंधी आपला वडिलांसंबंधी लिहिताना साहजिकच एरवी हातात तराजू आणि तरवार असणारे फडके हे हळुवारपणे तराजू आणि तरवारीचं भान ठेवूनही मोरपीस धारण करतात आणि स्वाभाविकपणे ही ललित व्यक्तिरेखा त्यांच्यां हातून उतरते. 'गांधींचा दूत' म्हणून असहकार आंदोलनात ज्यांच्याविषयी नोंद झाली ते दिनकरराव अमरावतीला राष्ट्रीय शाळा चालवीत होते. राष्ट्रीय कीर्तनकार दत्तोपंत पटवर्धन यांच्यापासून प्रेरणा घेतलेले फडके विनदिक्कतपणे सरकारवर टीका करण्याच्या आपल्या वृत्तीमुळे नातेवाईकांमध्येही अप्रिय झाले होते.

१९२१ पासून गांधींच्या विचारांमध्ये असणारे नाना फडके १९३७ नंतर हिंदुमहासभेचे पूर्णवेळ कार्यकर्ते म्हणून काम करू लागले हा त्यांच्यातील बदल नेमका कसा झाला याबद्दलचं चित्र मात्र अस्पष्ट आणि धूसर आहे. थोडेसे बरे दिवस पाहण्याचं सुख नानांच्या वाट्याला आलं नाही याची हुरहुर फडके व्यक्त करतात आणि या हुरहुरतीच या लेखाचा शेवट होतो.

'सहजीवन' या लेखात पत्नीची व्यक्तिरेखा साकार करता करता फडके यांनी जवळजवळ आपलं सर्व कुटुंबवृत्त मांडलं आहे. थोरले बंधू भालचंद्र यांनी आंतरजातीय विवाह केल्यामुळं आई सगळ्यांवरच संतापली होती आणि वासंती फडके यांना घरातही मन:स्वास्थ्य मिळालं नाही. तरी मनाचा तोल ढळू न देता त्यांनी फडके यांच्या नोकऱ्या सोडण्याच्या उपद्व्यापाला साथ दिली आणि खऱ्या अर्थाने सहजीवनाचा सोहोळा साजरा होऊ लागला. या अडचणीच्या दिवसांतही वासंती फडके यांनी जे समाधान दिलं आणि घेतलं होतं तेच दोघांच्या सहजीवनाच्या विश्रांतिस्थळाचा टप्पा होता. ती स्वत:साठी कधीच काही मागे नाही असं फडके लिहितात तेव्हाच वासंतीवाईंच्या तृप्त, समाधानी सहयोगाची साक्ष पटते. या पुस्तकातील अन्य व्यक्तिरेखा माधव मोहोळकर, विश्राम बेडेकर, एसेम, प्रवोधनकार ठाकरे. एलिझावेथ टेलर या अशाच वाचनीय व हृद्य आहेत.

## लेखनशैली

डॉ. य.दि. फडके यांच्या लेखनशैलीची अंगभूत वैशिष्ट्ये त्यांच्या साहित्याच्या वाचनानंतर लक्षात येतात. तर्कशुद्ध मांडणी हे त्यांच्या लेखनशैलीचे पहिले वैशिष्ट्य. एखाद्या घटनाक्रमाचे, प्रसंगाचे किंवा व्यक्तिजीवनाचे चित्रण करून काही निष्कर्षाप्रत त्यांना यायचे नसेल तर त्याची मांडणी तर्कपूर्ण असते. अर्थातच तर्कशुद्ध मांडणीसाठी लेखकाचा पूर्वाभ्यास भरपूर असावा लागतो. तसा फडके यांचा पूर्वाभ्यास सखोल व व्यासंगपूर्ण आहे असे सतत जाणवते. याच लेखात यापूर्वी जागोजागी जी अवतरणे उद्धृत केली आहेत त्यावरून हे प्रत्ययास येईल. याच वेळी आणखी एक गोष्ट ध्यानात येते ती अशी की राजकीय, सामाजिक विषयांवरील वैचारिक लेखन करताना फडके यांच्या लेखनशैलीचा वेगळ्या प्रकारचा आविष्कार असतो तर व्यक्तिरेखा साकारताना वा चरित्रलेखन करताना डॉ. फडके यांची लेखनशैली लालित्याचे सुंदर पण माफक अलंकार धारण करते. 'अमुचा प्याला दु:खाचा' या लेखाची सुरुवात अशी-

'उन्हे केव्हाच उतरली होती. आधीच फारसा उजेड नसणाऱ्या त्या खोलीत विजेचे दिवे प्रकाश देऊ लागले होते. थंडीचे दिवस. मुंबईतल्या हवेतही सुखद गारवा येऊ लागलेला. सकाळी दहापासून गोपनीय कागदपत्रं वाचून, टिपणं घेऊन शीण आला होता. लवकरच संध्याछाया पसरू लागणार आणि कार्यालयातून माणसांचे लोंढे बसच्या किंवा स्टेशनच्या दिशेने वाहू लागणार.'

अशा प्रकारे चित्रमय लेखनशैलीचा प्रत्यय त्यांच्या व्यक्तिरेखांमध्ये येतो. बेगम अख्तर यांच्यासंबंधीच्या लेखात गायक आपल्या चीजेची मांडणी ज्या शैलीदारपणे करून श्रोत्यांना मंत्रमुग्ध करेल त्याच पद्धतीने या लेखात फडके यांनी बेगम अख्तर यांचे व्यक्तिचित्र रेखाटले आहे.

*मधुर मधुर तोरे बैन, बिरहन के हरत चैन*
*भरभर आवत नैन, कूक सुतन बार बार...*

असे सूर शब्दांच्या माध्यमातून आपण ऐकत आहोत असे हा लेख वाचताना वाटते.

विसाव्या शतकातील महाराष्ट्रसारखे खंड लिहिताना मात्र त्यांची लेखणी पूर्णपणे वैचारिक होते आणि आधार पुरावे, अवतरणे यांच्यासह ती विवेचनास सिद्ध होते.

## डॉ. फडके यांची साहित्यदृष्टी आणि विचारसृष्टी

डॉ. फडके यांनी काही ग्रंथांची समीक्षणे अथवा काही काही साहित्यिकांची चरित्रे लिहिलेली आहेत. यांचा अपवाद वगळता त्यांनी साहित्यसमीक्षा या क्षेत्रातील स्वतंत्र लेखन केलेले नाही. त्यामुळे साहित्याचे प्रयोजन, साहित्याचा आविष्कार, शैली, अर्थविज्ञान इ. संबंधी त्यांची मते काय आहेत याबद्दल त्यांच्या साहित्याच्या वाचनानंतरच आपली मते आपल्याला बनवावी लागतील.

सत्यशोधन हे साहित्याचे अग्रक्रमांचे प्रयोजन असले पाहिजे असे फडके यांच्या साहित्याच्या परिशीलनानंतर लक्षात येते. या सत्यशोधनाची वाटचाल तरी कशी -' 'संशय ते नि:संशय'

अशी वाटचाल आहे. व्यक्तिरेखांचे लेखन सोडल्यास अन्य कोणत्याही प्रकारचे लेखन करताना सत्यशोधनासाठी फडके संशयानेच सुरुवात करतात अणि पुरावे आधार यांची छाननी केल्यावर नि:संशय होऊन मग आपले निष्कर्ष सांगतात. समाजदर्शन हे साहित्याचे दुसरे प्रयोजन दिसते. फडके यांच्या एकूण साहित्यात समाजाचा खूप मोठा विशाल 'कॅनव्हास' दृष्टीस येतो. समाजाची विविध अंगोपांगे समोर येतात. नुसत्या, नुसते प्रसंग यांच्याशिवाय त्यांची खोली आणि रुंदीही जाणवते. त्यांचा अन्वयार्थ समजतो. एकूणच सत्य-शिव आणि सुंदर यांच्यापैकी सत्याचा प्रवास करताना सत्य तेच शिव आणि तेच सुंदर असे डॉ. फडके यांना सांगायचे असावे असे म्हणता येते.

फडके यांची विचारसृष्टीही अशीच विशाल आहे. संयुक्त महाराष्ट्रासंबधी पाच खंडांमध्ये त्यांनी लेखन केले आहे. पण त्यातील विचारदर्शन केवळ महाराष्ट्राच्या भौगोलिक सीमांपुरते मर्यादित राहात नाही. तो विचार विशाल वर्तुळाचा विचार असतो. फडके यांच्या विचार सृष्टीचे पहिले वैशिष्ट्य ध्यानात येते ते असे की त्यांचे विचार माहितीने शिगोशीग भरलेले असतात. व्यक्तिनामे, स्थलनामे, घटना, साल, वर्ष, दिवस यांची अचूक माहिती त्यांच्या विचारांत असते. यामुळे त्या विचारांचा आराखडा हा भौतिक साधनसामग्रीने सज्ज असतो. मग या आराखड्यातील अंतरंग ते आपल्या विचारांनी रुजवतात. विविध प्रकारच्या सामाजिक चळवळी, उद्रेक, आंदोलने, व्यक्ती, प्रसंग, अधिवेशने, संमेलने, मुलाखती, भेटीगाठी यांच्या आधारे त्यांची विचारसृष्टी सजलेली असते. या विचारसृष्टीतील अनेक संदर्भ त्यांनी ठोस पुराव्याआधारे शोधून काढलेले असतात.

डॉ. फडके यांच्या एकंदर ग्रंथसंपदेचा विचार केल्यावर त्यांच्या साहित्यदृष्टीचे व विचारसृष्टीचे तीन पैलू ठळकपणे नजरेस येतात. संयुक्त महाराष्ट्राचे आंदोलन किंवा विसाव्या शतकातील महाराष्ट्र यांचे लेखन करणारे विवेचन फडके, कहाणी नेताजींची किंवा शोध बाळगोपाळांचा लिहिणारे अभ्यासक फडके आणि दृष्टादृष्ट किंवा व्यक्तिरेखा लिहिणारे ललितलेखक फडके. हे तीनही पैलू जोमदार आहेत.

**रहस्यकथालेखक फडके**

डॉ. फडके यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा मी सखोल आढावा घेऊन त्यात यशस्वी झालो आहे असं मलाही वाटत नाही. मात्र रहस्यकथा लिहिणारे फडके आपल्या साहित्याद्वारा जीवनाचे रहस्य उलगडून दाखवण्याचा कसा प्रयत्न करतात आणि कशी वाटचाल करतात ते आपणासमोर मांडण्याचा प्रयत्न मी केला आहे. त्या प्रयत्नांच्या मर्यादा मलाही माहीत आहेत. मात्र माझा हा प्रयत्न जिज्ञासूंना त्यांच्या अधिक प्रयत्नासाठी दार उघडून देईल असा विश्वास वाटतो.

□

डॉ. न. म. जोशी
१०१३, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

# अक्षरयज्ञ



गजानन क्षीरसागर

वि. स. वाळिंबे काळाच्या पडद्याआड गेले. सतत लेखनात आणि इतिहासवाचनात गर्क झालेला एक अक्षरयोगी त्यांच्या रूपानं आपल्या अवतीभवती वावरत होता; तो आता पुन्हा दिसणार नाही या जाणिवेने मनात खिन्नता दाटून येते. वाळिंब्यांचं सभोवती असणं, अगदी सदाशिव पेठेतील रस्त्यांवरून एका कडेनं, स्वत:च्याच तंद्रीत त्याचं जाणं येणं. नेहेमीसारखंच अगदी सहजपणे कुठेही गप्पा मारीत उभं राहणं आणि त्या पाच-दहा मिनिटांतच इतिहासप्रसिद्ध व्यक्तिमत्त्वाच्या जीवनाचा एखादा कप्पा किलकिला करून आपलं कुतूहल चाळवणं, अमृततुल्यमधला चहा चवीनं घेणं आणि चहाच्या घोटाबरोबरच सिगरेटचा विशिष्ट शैलीतला झुरका मनसोक्त घेऊन अग्निहोत्राची निष्ठेनं साधना करणं,पुन्हा थोड्याशा गप्पा आणि मग 'घरीच या ना एकदा' असं म्हणून पुन्हा तितक्याच संथपणे निघून जाणं हे सगळं डोळ्यांसमोर येतं आणि अशा या साध्यासुध्या, तुमच्या-आमच्यात अगदी पाण्यासारखं सहजपणे मिसळून गेलेल्या व्यक्तिमत्त्वाच्या मनाची मूस कोणत्या विचारांनी धगधगत होती याची ओळख करून घेण्यासाठी त्यांच्या पुस्तकांचाच मग धांडोळा घ्यावा लागतो. या पुस्तकांच्या ओळीओळीतून होणारं वाळिंब्यांचं दर्शन मग त्यांच्या नित्य आपल्या सभोवती वावरणाऱ्या रूपाहून खूप वेगळं आहे, याची जाणीव आपल्याला होऊ लागते.

ज्यांनी इतिहास घडविला अशी माणसं ही वाळिंब्यांच्या ललितसृष्टीतली त्यांची जिवाभावाची मित्र, आदरस्थानं ठरतात, अशा माणसांच्या कर्तृत्वाचा आलेख इतिहासाच्या पानापानातूनच जाणून घेताना वाळिंब्यांची जणू समाधीच लागते आणि मग त्यांची लेखणी या व्यक्तिमत्त्वांच्या कर्तृत्वाची गतिमान शिल्पं साकार करते. अगदी अलीकडचा वि. स. वाळिंबे यांचा 'सत्तावन ते सत्तेचाळीस' हा बृहद्ग्रंथ माझ्यासमोर आहे. राजहंस प्रकाशनने अतिशय देखण्या स्वरूपात तो प्रसिद्ध केलेला आहे. हा ग्रंथ नुसता पहिला तरी वाळिंबे यांना मी अक्षरयोगी का म्हणतो याची वाचकांना कल्पना येईल.

१९९७ हे भारताच्या स्वातंत्र्याचं सुवर्णमहोत्सवी वर्ष. या निमित्ताने हा देश स्वतंत्र झाला तो नेमका कसा, कोणामुळे झाला, किती मोठी किंमत मोजून हे स्वातंत्र्य आपण मिळवलं, याची ओळख वाचनीय कहाणीच्या स्वरूपात करून देण्याच्या कल्पनेतून या बृहद्ग्रंथाची निर्मिती झालेली आहे.

तसं म्हटलं तर हा इतिहास-ग्रंथ नाही, पण आपल्या स्वातंत्र्य संग्रामाची संपूर्ण इतिहासाची रूपरेषा जाणून घेण्यासाठी या ग्रंथाचा फार मोठा उपयोग आहे.

श्री. वाळिंबे यांनी अतिशय बोलक्या लेखनशैलीचा उपयोग करून सादर केलेली ही स्वातंत्र्यसंग्रामाची कहाणी पहिल्या पानापासूनच रंगतदार होऊ लागते. लाल किल्ल्यात आझाद हिंद सेनेच्या अधिकाऱ्यांवर सुरू झालेल्या खटल्यात वकिलाचा काळा डगला अंगावर चढवून पंडित जवाहरलाल नेहरू आरोपींच्या बचावासाठी उभे राहिल्याचे दृश्य उभे करून वाळिंबे आझाद हिंद सेनेचा एक रोमांचकारक चित्रपटच उभा करतात. याच लाल किल्ल्यावरून १५ ऑगस्ट १९४७ ला ध्वजारोहण करून नेहरूंनी भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीचे मंगलाचरण गाइले आणि सतत नव्वद वर्षे अविरत चाललेल्या स्वातंत्र्यसंघर्षाची सांगता घडवून आणली.

या नव्वद वर्षांत नेमक्या कोणत्या घटना घडल्या? पुस्तकाच्या पुढच्याच प्रकरणात वि. स. वाळिंबे १८५७ सालात प्रवेश करतात. क्रांतिकारकांची गुप्त स्वरूपाची चळवळ, चपात्यांच्या साहाय्याने संदेश पोहोचवणे, तांबड्या कमळांचा प्रसार आदी थरारक घटना उभ्या करून १८५७ च्या स्वातंत्र्यसमराची झलक वाळिंबे मोजक्या शब्दांत उभी करतात. स्वातंत्र्यदेवतेला मंगल पांडेच्या रूपाने पहिला बळी अर्पण केला गेला. त्या मंगल पांडेची चित्तथरारक कथा पुढील पानातून उलगडू लागते अणि पुढील जवळजवळ दोनशे पानांतून १८५७ चे समर आणि त्याची अखेर याची इतिहास-कहाणी अतिशय रंगतदार पद्धतीने श्री. वाळिंबे यांनी सादर केलेली आहे. दिल्लीचा अखेरचा नामधारी बादशहा बहादूरशहा याची करुण कहाणी, दुसऱ्या बाजीरावाच्या निधनानंतर कंपनी सरकारने तनखा बंद केल्याने अस्वस्थ झालेले नानासाहेब, अगदी इंग्लंडपर्यंत वकील पाठवून त्यांनी निदान निम्मा तरी तनखा आपल्याला देण्यात यावा, यासाठी केलेली अयशस्वी खटपट आणि यातूनच इंग्रजांना देशाबाहेर हाकलून देण्याची त्यांना लाभलेली प्रेरणा आणि बंडखोरांनी त्यांचे स्वीकारलेले नेतृत्व, कानपूर येथील इंग्रजांची कत्तल, नानासाहेबांची उलघाल, दुबळ्या बहादूरशहाचे केविलवाणे अस्तित्व, तात्या टोपेंचा पराक्रम, महाराणी लक्ष्मीबाईंने केलेली शर्थीची झुंज आदी प्रसंग उभे करताना वाळिंबे यांची लेखणी एक वेगळेच परिमाण गाठते. संपूर्ण स्वातंत्र्यसमर आपल्यापुढे अगदी या क्षणी घडत आहे आणि आपण एक थरारक चित्रपटच पाहत आहोत, असं वाटावं असं चित्रदर्शी लेखन वाळिंबे सहजतेने करून जातात.

बंडाचे दक्षिणेकडे उमटलेले पडसाद, बंडापूर्वी उमाजी नाईकाने इंग्रजांना घालवून देण्यासाठी केलेली धडपड, बंडाची झालेली अखेर यांचं वर्णन करून १८५७ नंतरच्या कालखंडाकडे ते आपल्याला घेऊन जातात.

वासुदेव बळवंतांची धडपड, इंडियन नॅशनल काँग्रेसची स्थापना, लोकमान्य टिळकांचा केसरी, चापेकर बंधूंनी केलेला रँडचा खून, चापेकरांना पकडून त्यांना फाशी देईपर्यंतचा इतिहास, टिळकांनी राजकारणात घेतलेली पुढची झेप, काँग्रेसची गाजलेली अधिवेशने, लोकमान्यांची मंडालेला रवानगी, चाफेकरांच्या मृत्युमुळे अस्वस्थ होऊन भारतमातेला आपलं सर्वस्व अर्पण करण्याच्या जिद्दीने सशस्त्र क्रांतीचा पुरस्कार करणाऱ्या



विनायक सदाशिव वाळिंबे, बी. ए.
११ ऑगस्ट १९२८

**प्रकाशित साहित्य :** आज इथे-उद्या तिथे, व्होल्गा जेव्हा लाल होते, वॉर्सा ते हिरोशिमा, पराजित-अपराजित, हिटलर, सावरकर, स्टॅलिनची मुलगी, इस्रायलचा वज्रप्रहार, जयहिंद-आझाद हिंद, तीन युद्धकथा, बंगलोर ते रायबरेली, रायबरेली आणि त्यानंतर, युवराज, स्वातंत्र्यसंग्राम-ज्ञात आणि अज्ञात, अठराशे सत्तावनची संग्रामगाथा, ऑपरेशन थंडर, १९४७, सत्तावन्न ते सत्तेचाळीस, गरुडझेप, नेताजी, श्रीशिवराय, आपला स्वातंत्र्य लढा, दुसरे महायुद्ध.

**अनुवादित साहित्य :** वुई दि पीपल, वुई दि नेशन, राजमाता, कर्मवीर भाऊराव पाटील, एडविना आणि नेहरू, भारत विकणे आहे, कथा ही दिवावादळाची, फसलेला क्षण, अरुण शौरी निवडक लेख, सातवे सोनेरी पान, वासष्टचे गुन्हेगार.

**शिष्यवृत्ती :** पत्रकारितेतल्या उच्चशिक्षणासाठी थॉमसन फाऊंडेशन, इंग्लंड यांची शिष्यवृत्ती. त्या निमित्ताने तीन महिने इंग्लंडमध्ये वास्तव्य व काही युरोपियन देशांना भेटी - १९६५.

**प्रमुख पुरस्कार :** महाराष्ट्र शासन पुरस्कार - ग्रंथ - व्होल्गा जेव्हा लाल होते - १९६९.
मारवाडी सम्मेलन साहित्य पुरस्कार-नेताजी-१९९२.
दत्तो वामन पोतदार पुरस्कार - ग्रंथ - १९४७.
सुभाषचंद्र बोस मेमो. ट्रस्ट पुरस्कार - १९९७.
न. चिं. केळकर पारितोषिक - सत्तावन्न ते सत्तेचाळीस - १९९७.
पुणे श्रमिक पत्रकार संघ - ज्येष्ठ पत्रकार पुरस्कार - १९९७.
महाराष्ट्र शासन पुरस्कार - सत्तावन्न ते सत्तेचाळीस - १९९८.
शं. ना. जोशी पुरस्कार - स्वातंत्र्य संग्राम - ज्ञात आणि अज्ञात - १९९९.

सावरकरांचा उदय, त्यांचे क्रांतिकार्य, त्यांना झालेली जन्मठेपेची शिक्षा, लोकमान्य टिळक मंडालेहून सुटून पुन्हा पुण्याला परतले, होमरूल चळवळ, चिरोल खटला आणि १९२० साली झालेली लोकमान्य टिळकांची अखेर अशा गतीने ही इतिहासकहाणी पुढे सरकत राहते.

इस्ट इंडिया कंपनी भारतावर राज्य करीत असताना १८५७ साली झालेल्या उठावापासून लोकमान्य टिळकांचा उदय, स्वा. सावरकरांची वीरगाथा, होमरूल चळवळ, मादाम कामांचे प्रयत्न, ह्यूम यांनी स्थापन केलेली काँग्रेस आदि घटनांचे रसभरित वर्णन करून लोकमान्य टिळकांच्या १९२० साली झालेल्या निधनाने टिळकयुगाच्या अस्तापर्यंतचे इतिहास-कथाकथन करून श्री. वाळिंबे या वृहद्ग्रंथाचा प्रथमार्ध पूर्ण करतात.

'सत्तावन ते सत्तेचाळीस' या ग्रंथाच्या द्वितीयार्धात इतिहासाची कथा पुन्हा मागे जाते. १८९९ साली कर्झन व्हाइसरॉय म्हणून भारतात आले. येथपासून या मागाचा प्रारंभ होतो. कर्झन यांची स्वभाववैशिष्ट्ये, त्यांची कामगिरी, भारताबद्दलची त्यांची मतं, बंगालची फाळणी करण्याचा त्यांचा डाव, त्यातून बंगालमध्ये उसळलेला असंतोष, कलकत्त्याहून राजधानीचे दिल्लीला लॉर्ड हार्डिज यांच्या कारकीर्दीत झालेले स्थलांतर, बंगालची फाळणी रद्द केल्याची घोषणा, सिंगापूर येथे झालेले सेनेचे बंड, पंजाबी लोकांची 'हिंदू असोसिएशन ऑफ द वेस्ट कोस्ट' ही अमेरिकेत स्थापन झालेली संस्था, लाला हरदयाळ यांनी सुरू केलेले 'गदर'

नावाचे वृत्तपत्र आणि यातून ब्रिटिशांविरुद्ध भारतीयांच्या मनात असंतोषाची पडलेली ठिणगी. 'गदर'चे निरनिराळ्या भाषांत प्रकाशन आणि 'गदर' चळवळीने घेतलेला वेग. देश स्वतंत्र करण्यासाठी 'गदर' क्रांतिकारकांनी उचललेली सशस्त्र क्रांतीची पावलं यांचे विलक्षण वेगवान वर्णन करून वाळिंबे या चळवळीत धडपडणाऱ्या क्रांतिकारकांची ओळख करून देतात. राजा महेंद्रप्रताप, श्यामजी सरदारसिंग राणा यांची विस्मृतीत गेलेली कामगिरी पुन्हा जिवंतपणे आपल्यापुढे साकार होते. मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांचा हा कालखंड होता. टिळकांची सिंहगर्जना देशाच्या कानाकोपऱ्यात जाऊन पोहोचत होती. भारतीय माणूस स्वातंत्र्यप्रेरित झालेला होता. एवढ्या तेवढ्या सुधारणांचे तुकडे त्याच्या तोंडावर फेकून त्याला वश करून घेण्याचे दिवस संपलेले होते.

गांधी युगाला प्रारंभ झालेला होता. टिळकांच्या अस्तानंतर म. गांधींचे नेतृत्व वेगळ्या शैलीत आकार घेऊ लागलेले होते. जालियनवाला बाग हत्याकांड याच सुमारास १९१९ मध्ये झाले होते. सगळा देश पेटून उठलेले होता. या हत्याकांडाचे वर्णन करताना वाळिंबे यांची लेखणी एक वेगळेच रूप धारण करते. घटना... असंख्य घटना... देशाच्या निरनिराळ्या भागात क्रांतिकार्याला आलेला विलक्षण वेग हे... हे सगळं शब्दबद्ध करताना कालानुक्रम काहीसा पुढे मागे सतत होत आलेला असूनही क्रांतीचा एक ज्वलंत, धगधगता आलेख मांडण्यात वाळिंबे कमालीचे तन्मय झाल्याचे जागोजागी आढळून येते. चितगाव मुक्तीसाठी सूर्यसेन आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी लावलेल्या प्राणाच्या बाजीचे वर्णन वाचताना अंगावर अक्षरशः काटा उभा राहतो. या सगळ्या देशभक्तांनी कशासाठी हे हौतात्म्य पत्करले, त्यांना यातून कोणता लाभ होणार होता? कोणती पदं मिळणार होती? बलाढ्य इंग्रजांशी पाच पन्नास जण कितपत लढा देऊ शकतील, या प्रश्नांनी त्यांना घेरलं नसेल का? ही माणसं कोण होती? भारताच्या कानाकोपऱ्यात वाढत आलेली ही तुमच्या-आमच्यासारखीच सामान्य माणसं होती. पण देशप्रेमानं भारलेली, स्वातंत्र्याच्या मंत्राच्या जादूने बेभान झालेली ही माणसं डोंगराएवढा पराक्रम करीत होती, त्यांना सुचेल त्या प्रमाणे लढे देत होती.

हे सगळं वाचत असताना मनात असंख्य प्रश्न उभे राहतात. एवढ्या लोकांच्या धडपडीनं स्वातंत्र्य जवळ आणण्यास हाताभर नक्कीच लावला होता. वैयक्तिक पराक्रम अयशस्वी ठरले होते, तरीही स्वातंत्र्याच्या वाटचालीला गती आणण्याच्या दृष्टीने ते नक्कीच महत्त्वाचे ठरले.

'प्यायला पाणी नाही, पण तुम्ही माझ्याजवळचा हा आंबा खा' असं म्हणून काकोरीच्या लढ्यात अगदी अखेरच्या पराभवाच्या वेळी पुलीन नावाचा क्रांतिकारक लोकनाथांपुढे आंबा धरतो अणि त्याच वेळी बंदुकीची गोळी पुलीनच्या शरीरात घुसते. आंबा रक्ताळतो, पुलीन गतप्राण होतो. लोकनाथ थरथरत्या हाताने आंबा घेतात आणि कोणताही विचार न करता आंबा खातात.

या प्रसंगाचं वर्णन करून वाळिंबे लिहितात- 'माणसाला शरीर नाकारता येत

नाही... शरीराची भूक आवरता येत नाही - प्रसंग कसाही असला तरी.'

भगतसिंगांचा पराक्रम, राजगुरू, सुखदेव, भगतसिंग यांची फाशी. इतिहासातले हे क्षण वाळिंबे यांनी पुन्हा या ग्रंथात साकार केलेले आहेत. नेताजी सुभाषचंद्र बोसांची चित्तथरारक कथा या ग्रंथात पुन्हा जिवंत होऊन उठते... असंख्य क्रांतिकथांनी भरलेला हा ग्रंथ म्हणूनच मराठी वाङ्मयाचं एक लेणं होऊन बसतं.

म. गांधी, नेहरू, जीना, लॉर्ड माऊंटबॅटन, सरदार पटेल या सर्वांच्या राजकीय हालचाली, भारताची फाळणी आणि १५ ऑगस्टला भारताला मिळालेलं स्वातंत्र्य इथपर्यंतचा इतिहास सांगून वाळिंबे थांबलेलं नाहीत तर स्वातंत्र्यानंतर निर्वासितांची झालेली ससेहोलपट, असंख्य उद्ध्वस्त झालेले संसार, याचंही वर्णन ते खिन्न मनाने करतात.

भारतीय स्वातंत्र्यसंग्रामात सहभागी झालेल्या चार पिढ्यांचा हा इतिहास कथाकथनाच्या शैलीत वाळिंबे यांनी साकार केलेला आहे.

या क्रांतिकार्यात स्वत:ला कोणत्याही लाभाची अपेक्षा न करता झोकून देणाऱ्या असंख्य तेजस्वी भारतीयांची, त्यांच्या हौतात्म्याची ही चरितकहाणी आहे. हा इतिहास-ग्रंथ नाही पण माणसाच्या मनात उमटणाऱ्या ऊर्मीतूनच इतिहास साकार होत असतो. अशा ऊर्मीचे हे प्रभावी दर्शन आहे.

सुमारे अकराशे पृष्ठांच्या या वृहद्ग्रंथाचं लेखन श्री. वि. स. वाळिंबे यांच्या हातून घडलं आणि पुढील पिढ्यांसाठी एक अतिशय प्रभावी अशी स्वातंत्र्यकथा मराठी वाचकांना लाभली.

मला वाटतं, वाळिंबे यांचा इतका प्रदीर्घ असा हा अखेरचाच अक्षरयज्ञ असावा. या ग्रंथाच्या लेखनाने त्यांनी अक्षरयोगाची सांगता केली, असं म्हटलं तर ते योग्यच होईल.

या अक्षरयोग्याच्या स्मृतीला माझे प्रणाम!

*सत्तावन ते सत्तेचाळीस*

*वि. स. वाळिंबे, पृष्ठे डेमी १०८०, मूल्य रु. ७००/-, राजहंस प्रकाशन, पुणे.*

□

*गजानन क्षीरसागर, अनिरुद्ध, ३२/९, अनुपम पार्क, कोथरूड, पुणे ४११ ०२९.*

स. न. वि. वि.

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचा ऑक्टोबर १९९९ ते मार्च २००० चा जोड अंक पोचला. या अंकात आपण परिषदेची सध्याची गंभीर आर्थिक परिस्थिती विशद करून परिषदेच्या सभासदांना एक आवाहन केले आहे.

महत्त्वाचं, मौलिक असं मराठी साहित्यविषयक लिखाण व माहिती या मुखपत्राद्वारे सभासदांना प्राप्त होत असते; मराठी वाचकांना, मराठीच्या अभ्यासकांना उपलब्ध होत असते. तरी महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचं प्रकाशन अनियमित वा बंद पडता कामा नये.

या पत्राबरोवर एक छोटीशी रक्कम रुपये पाच हजार चेकने पाठवीत आहे. कृपया स्वीकार व्हावा. इतर काही मी करण्याजोगं काम असेल, तर सांगावं. कळावे.

शशिकला काकोडकर (पणजी, गोवा)



अनुक्रमणिका






मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश

# आमची नवी प्रकाशने

**कर्तृत्वाचा महामेरू : कै. के. व्ही. लक्ष्मणराव चरित्र व वाङ्मय**

**लेखक व संपादक : प्रा. द. पं. जोशी**

पृष्ठे : ३००, मूल्य रु. २५०

मराठी व तेलुगू भाषा साहित्य व संस्कृतीची मनोभावे पूजा करणाऱ्या महामानवाच्या कर्तृत्वाचा वाङ्मयीन आलेख

●

**चिं. नी. जोशी : व्यक्ती आणि वाङ्मय**

**संपादक : प्रा. द. पं. जोशी**

पृष्ठे : २५०, मूल्य रु. २००

विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात मराठीला विद्यापीठीय प्रतिष्ठा प्राप्त करून देणाऱ्या व साहित्य संशोधन, अभ्यास, वाङ्मयीन चळवळ इ. विविध उपक्रमांच्या शिलेदाराच्या सर्व स्फुट संशोधनपर लेखांचा संग्रह.

●

**तेलुगू साहित्य परिचय**

**लेखक : कै. भालचंद्र आपटेशास्त्री**

पृष्ठे : २५० मूल्य रु. १००

कृष्णा-गोदेच्या उगमापासून ते विस्तारापर्यंत पसरलेल्या वाङ्मयीन संस्कृतीची कहाणी.

४० तेलुगू लेखक-कवींचा मराठीत प्रथमच परिचय, परंपरा व इतिहासासह.

●

**पंचधारा समग्र लेखक-लेखन सूची (१९५८-१९९८)**

**संकलक : मीना मनसबदार-टिळक**

४० वर्षांच्या वाङ्मयीन घटितातील प्रत्येकाची शिस्तबद्ध नोंद.

●

**नाथपंथी ज्ञानेश्वर व वारकरी ज्ञानदेव**

**लेखक : डॉ. श्री. रं. कुळकर्णी, पृष्ठे : ११० मूल्य रु. १००**

नाथसंप्रदाय व वारकरी यांचे तौलनिक व निर्णायतमक विवेचन

●

**संवाद आणि संघर्ष** (मूल्य रु. १००)

**कै. गोपाळराव एकबोटे यांच्या आठवणी**

माळरानावरील छोट्या बीजातून आकाशमार्गाने घेतलेल्या वृक्षाच्या झेपेची संघर्षमय कहाणी.

टपालखर्च निराळा

संपर्क : **मराठी साहित्य परिषद,** आंध्र प्रदेश, हैदराबाद ५०० ०२७.

# चित्रमय शैलीच्या कादंबरीकार



डॉ. विनया डोंगरे

स्वातंत्र्योत्तर कालखंडात 'कादंबरीकार' म्हणून स्थान मिळवणाऱ्यांमध्ये ज्योत्स्ना देवधर हे नाव आवर्जून घ्यावे लागते. मराठी कादंवरीलेखन करणाऱ्या लेखिकांची संख्या खूप आहे. निर्मितीचा वेगही मोठा आहे. लेखिकांची संख्या खूप वाढलेली असूनही त्यामध्ये 'ज्योत्स्ना देवधर' हे नाव निश्चितच 'ठळक' आहे. नाव घेण्याजोग्या ज्या मोजक्या लेखिका आहेत, त्यामध्ये त्यांचा समावेश आहे.

'घर गंगेच्या काठी' ही १९६७ मध्ये लिहिलेली ज्योत्स्नाबाईंची पहिली कादंवरी. ही कादंवरी प्रकाशात येण्याच्या अगोदर ज्योत्स्नाबाईंनी कथालेखन केले होते, पण ते हिंदी भाषेतून. मराठी लेखनाशी संबंधच आलेला नव्हता. ज्योत्स्नाबाई म्हणतात की, 'मी बऱ्यापैकी लिहू शकते, याची जाण या कादंबरीने मला आणून दिली.' अनेक जाणकारांनी भाषेचे आणि शैलीचे कौतुक केले. 'घर गंगेच्या काठी' या त्यांच्या पहिल्याच कादंबरीला महाराष्ट्र सरकारचा हरि नारायण आपटे पुरस्कार मिळाला. 'घर गंगे...' बद्दल बोलताना ज्योत्स्नाबाई म्हणाल्या, 'पहिल्याच कादंबरीनं मी प्रकाशात आले. मीच माझी कादंबरी परत वाचली, तेव्हा वाटलं, खरंच आपण छान लिहिलंय ! अगदी सहजपणे, अभावितपणे. कुठलाही आराखडा, चर्चा, मांडणीचा विचार न करता मी ती कादंबरी लिहिली, माझ्या लेखणीची ताकद, माझ्या भाषेचा बाज, माझ्या शैलीची लय या कादंबरीनं मला जाणवून दिली. हिच्या यशानं मला आत्मविश्वास आला. जाणकारांच्या स्तुतीनं, कौतुकानं, वाचकांच्या 'वाहवा'नं मला लिहितं ठेवलं.'

अशा प्रकारे पहिल्याच कादंबरीने ज्योत्स्ना देवधर हे नाव प्रकाशझोतात आलं. ह्या कादंवरीनं यश मिळवलं, तिच्या अनेक आवृत्त्याही निघाल्या. 'घर गंगेच्या काठी' या कादंवरीचा विषय तसा साधाच आहे. अगदी घरगुती आहे. एका उद्ध्वस्त होऊ पाहणाऱ्या कुटुंबाची भावकथा यात साकार झालेली आहे. ह्या कादंबरीची निर्मिती प्रक्रिया सांगताना ज्योत्स्नाबाई म्हणाल्या, 'एकदा आई-वडिलांना भेटायला म्हणून त्यांच्या घरी गेले. त्यावेळी वडील विचारमग्न आणि आई अस्वस्थ. अस्वस्थतेचे कारण वडील 'मृत्युपत्र' करणार होते. 'माझ्याजवळ काय आहे? काहीच नाही ! मी कशाचं मृत्युपत्र करू सांग ना?' ह्या आईच्या उद्गारांनी मी अंतर्बाह्य हादरले आणि 'घर गंगेच्या काठी' या कादंवरीची निर्मिती झाली. मी एकत्र कुटुंबात वाढले. घरात संस्कारित वातावरण. घरातल्या काकू, आत्यांसारख्या विधवांचं दु:ख मी पाहत होते. मारवाडात स्त्रियांवर होणाऱ्या अन्यायचंही दर्शन घडत होतं. सासरी होणारे बायकांचे हाल पाहत होते. शरदबाबूंच्या सोशिक नायिकाही डोळ्यांपुढे होत्या. त्याच वेळी हे देखील जाणवत होतं, की एकूण भारतीय स्त्रियांची अंगभूत ताकद 'सहनशीलता' हीच असते. ती चांगली की

**श्रीमती ज्योत्स्ना देवधर**

१२०५/१-९ कौस्तुभ हौसिंग सोसायटी, शिवाजीनगर, पुणे ४११ ००४.

जन्म : २७ फेब्रुवारी १९२६ (जोधपूर, राजस्थान)

एम्. ए. (हिंदी), पुणे विद्यापीठ

साहित्य विशारद - वर्धा

निवृत्त वरिष्ठ प्रोड्युसर, आकाशवाणी पुणे केंद्र (गृहिणी १९६० ते १९८४)

'अंतरा' या हिंदी कथासंग्रहाला भारत सरकारचे अहिंदी भाषा भाषी लेखकांसाठी असलेला पुरस्कार - १९६७-६८.

'घर गंगेच्या काठी' या मराठी कादंबरीला महाराष्ट्र सरकारचा हरिभाऊ आपटे प्रथम पुरस्कार - १९६८-६९.

'घर गंगेच्या काठी' या मराठी कादंबरीला महाराष्ट्र सरकारचा प्रथम उत्कृष्ट प्रकाशन पुरस्कार - १९६८-६९.

'कॅक्टस' या हिंदी कथा संग्रहाला विहार राष्ट्र भाषा परिषद द्वारा प्रथम पुरस्कार व ताम्रपट : १९८१-८२.

'कल्याणी' हिंदी नाटकाच्या हस्तलिखितास उत्तर प्रदेश संगीत नाटक अकादमी पुरस्कार १९८८-८९.

'निर्णय' या पुरुषपात्र विरहित नाटकास वनिता समाज, मुंबई तर्फे आयोजित अखिल भारतीय प्रतियोगिता स्पर्धेत प्रथम पुरस्कार.

कलकत्याच्या भारतीय भाषा परिषदेतर्फे १९८८ सालचे उत्तम कादंबरीचे पारितोषिक 'रमाबाई' या कादंबरीस देण्यात आले.

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे तर्फे 'रमाबाई' या कादंबरीस चरित्रात्मक कादंबरीचा नातू पुरस्कार १९९०.

पुणे मराठी ग्रंथालय यांच्या ८० व्या वाढदिवसानिमित्त मराठी साहित्यातील महनीय कार्याबद्दल गौरव करण्यात आला - १९९१.

अखिल भारतीय भाषा साहित्य संमेलन, भोपाल यांचे तर्फे भारत भाषा भूषण ही मानद पदवी देण्यात आली. - १९९४.

हिंदी साहित्य संमेलन, अलाहाबाद यांचेतर्फे हिंदी प्रचार-प्रसार एवं रचनात्मक साहित्य सेवेसाठी २७ जून १९९४ रोजी मुंबईत सन्मान करण्यात आला.

भारत सरकारच्या शिक्षण खात्यातर्फे हिंदी भाषी लेखकांसाठी असलेला पुरस्कार राष्ट्रपतींच्या हस्ते 'कल्याणी' या हिंदी नाटकाला देण्यात आला - १९९३-९४.

मुंबई येथे 'नाट्यदर्पण' संस्थेतर्फे विशेषांक व विशेष सन्मान-सत्कार - १९९४.

महाराष्ट्र राज्य हिंदी साहित्य अकादमी तर्फे 'कल्याणी' या हिंदी नाटकाला विष्णुदास भावे पुरस्कार - १९९६.

महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे मे १९९९ मध्ये विशेष सन्मान.

सन्मान :

कराड येथे १९७५ ऑक्टोबर मध्ये महिलावर्ष निमित्त पश्चिम महाराष्ट्र कथा लेखिका संमेलनाचे अध्यक्षपद.

१९७६ मध्ये अंबेजोगाई येथे जिल्हा महिला परिषद - अध्यक्षपद.

शिवाजी, मराठवाडा, पुणे, कर्नाटक, इस्लामि या विद्यापीठात घर गंगेच्या काठी, कल्याणी, पडझड कादंबऱ्या अभ्यासासाठी लागल्या होत्या.

कल्याणी - हिंदी नाटक पंडित परीक्षेसाठी नियुक्त.

महाराष्ट्र राज्य नाट्य परिनिरीक्षण मंडळावर सातवर्ष सभासद.

महाराष्ट्र राज्य ग्रंथ पुरस्कार समितीवर दोनदा निर्णायक सभासद.

Writers WHO'S WHO मध्ये नाव - कर्तृत्व समाविष्ट.

अनेक कथांचे कन्नड, तेलगू, तमिळ, मल्याळम्, असामी, हिंदी, इंग्रजी भाषेत अनुवाद त्या त्या प्रमुख पत्रिकेत प्रसिद्ध.

लेखन :

आजवर (१९९५) ५० हिंदी मराठी पुस्तके प्रकाशित (कथा-कादंबरी, नाटक, स्फुट लेखन, चरित्रात्मक लेखन इत्यादी.)

घर गंगेच्या काठी : चित्रपट कथा, पटकथा संवादलेखन.

कल्याणी - मराठी नाटक - पी. डी. ए. तर्फे १०० एक यशस्वी प्रयोग झाले.

कल्याणी - टी.व्ही. सिरियलचे लेखन.

मुलांसाठी नाटक - आजीची छडी गोड गोड छडी.

देशभर हिंदी-मराठी कथाकथन कार्यक्रम.



अनुक्रमणिका






वाईट आहे हा वेगळा मुद्दा. या सोशिक बायकांमध्येच 'कल्याणी' आहे आणि 'घर गंगेच्या काठी'मधील 'जानकी' आहे. या आंतरिक ठिणगीमुळे'च खूप विरोधातही त्या उभ्या राहतात, त्यांच्या परीने अन्यायाचा प्रतिकार करतात, हेच मला या कादंबऱ्यांमधून सुचवायचं आहे.'[२]

'घर गंगेच्या काठी' ही तशी आकाराने लहान असलेली कादंबरी. पण ह्या लहानग्या कादंबरीत एकत्र कुटुंब पद्धतीचे, स्त्री-जीवनाचे अत्यंत करुण आणि मनोज्ञ दर्शन लेखिकेने अत्यंत समर्थपणे घडवले आहे. मोजक्या शब्दांतून वरंच काही व्यक्त करणारी, अशी संयमित आणि प्रभावी भाषा हे या कादंबरीचे वैशिष्ट्य. जीवनविषयक समस्यांचे चित्रण या कादंबरीत आहे. एकत्र कुटुंब पद्धतीतील ताण-तणाव, सुख-दुःख, संवाद-विसंवाद इत्यादी गोष्टी साकार झालेल्या आहेत. आयुष्यभर झगडा केलेली जानकी श्रांत आणि थकल्या डोळ्यांनी आपल्या गत आयुष्याकडे बघते आहे. आयुष्याचा आढावा घेत आहे. हातात काहीच उरलेलं नाही, ही भावना मनात दाटलेली आहे. रितेपणाची पोकळी मनात आहे. कादंबरीची सुरुवात त्या दृष्टीने बघण्यासारखी आहे. - 'आठवणींची शेंग सोलत बसले आहे. बोटं दुखायला लागली आहेत. कंवर भरून आलेले आहे. पाठीचा कणा शेंगेसारखा उकलेल की काय असं वाटतंय. टरफलांचा ढीग मोठामोठा होत चाललाय. पातेल्यात दाणे साचतच नाहीत.' आयुष्यात अनेक गोष्टी भोगाव्या लागल्यामुळे मन भरून आलेली अशी ही स्त्री. गंगाधरभावजी आणि जानकी यांच्यामधील तेढ स्पष्टच आहे. जानकी आणि तिचा पती यांच्यात दुरावा निर्माण झालेला आहे. धाकट्या दिराबद्दल मात्र निस्सीम प्रेम आहे. अशीही विविध रूपांतील जानकी. विरक्त आणि उदास मनोवृत्तीने भरून राहिलेली ! अशी ही आकारानं छोटी पण अंतरंगात खूप वेदना साठवलेली कादंबरी एका स्त्रीची व्यथा बोलकी करते. 'घर गंगेच्या काठी' ह्या कादंबरीवर अभिप्राय देताना प्रा. निशिकांत मिरजकर म्हणतात, 'या कादंबरीच्या आकृतीला थिटेपणाच्या मर्यादा आहेत, पण या थिटेपणातच रेखीवपणा आहे, सहज सुंदरता आहे. मनाला काही वेळ उदास करण्याचे, भारावून टाकण्याचे सामर्थ्य आहे.[३]' प्रा. निशिकांत मिरजकर यांची ही प्रतिक्रिया यथायोग्यच आहे. अशा प्रकारे 'घर गंगेच्या काठी' ही कादंबरी अनेक कारणांनी वाचकांना आवडली. तर 'आयुष्याला सामोरी जाणारी लेखिका' म्हणून सुप्रसिद्ध समीक्षक श्री. शंकर सारडा यांनी या कादंबरीचा गौरव केला. 'घर गंगेच्या काठी' मधील वातावरण. त्यातील पात्रे, स्त्रियांचा सोशिकपणा लेखिकेनं अनुभवलेलाच होता. सासरी-माहेरी एकत्र कुटुंबात ह्या माणसांना त्यांनी पाहिलं होतं. त्यांचा तोंडावळा त्यांना ठाऊक होता. त्या म्हणाल्या, 'कादंबरीतील पात्रं आपापला तोंडावळा घेऊन समोर उभी ठाकली. त्यांची भाषा ते बोलू लागले. बायका सूत्रमय म्हणीसारखी भाषा बोलत होत्या. पुरुष समर्थ, हुशार, रागीट, हेकट, कर्तव्यदक्ष पण अरेरावी करत वावरत होते. त्यांचे तेच बोलत राहिले. कादंबरी पुढे सरकत राहिली. त्या वाड्याच्या भिंती, तिथले उंबरे, तिथला जिना, ते देवघर, तो झोपाळा सगळं सगळं माझ्या ओळखीचं आहे. कुणाकुणाच्या स्वभावाचं रसायन होऊन एक निराळंच व्यक्तिमत्त्व तयार होत गेलं. बायकांचं अबोल सोशिकपण, अखंड सेवावृत्ती, संसारासाठी संपून, विरून,

विरघळून जाण्याची खोड मी लहानपणापासून पाहते आहे, अनुभवते आहे. वडिलांचा दरारा, थोरल्या दिराचा धाक रूप, रस, गंधासह आठवतो. आई, काकू, मावशी, आत्या, जाऊ या सगळ्या मला अजूनही अस्वस्थ करतात. कुठल्या मातीनं या घडल्या असं वाटतं.[४]' अशा प्रकारे 'घर गंगेच्या काठी' या कादंबरीच्या निर्मितीमागे इतक्या गोष्टी दडलेल्या होत्या.

'घर गंगेच्या काठी' नंतर पाठोपाठच म्हणजे १९६८ ला ज्योत्स्ना देवधर यांनी 'कल्याणी' ही कादंबरी लिहिली. 'कल्याणी' ही कादंबरी खूप गाजली. या कादंबरीची चित्रपट, नाटक, दूरदर्शन मालिका अशी अनेक रूपांतरे झाली. एखादी वास्तू, एखादे कुटुंब 'शापित' असले तर काय घडू शकते, याचा प्रत्यय 'कल्याणी' वाचताना येतो. वैधव्याचा पारंपरिक शाप असलेलं एक दुर्दैवी कुटुंब 'कल्याणी' कादंबरीत दिसतं. ह्या दुर्दैवी कुटुंबात प्रवेश करणाऱ्या कल्याणीची कथा, मोजक्या आणि नेमक्या शब्दांतून, ठसठसत राहिलेल्या तिच्या दु:खातून साकार होते. माणसाचे दु:ख अभिव्यक्त करण्याची प्रत्येकाची पद्धत वेगवेगळी असते. कल्याणीचं दु:ख ज्योत्स्नाबाई नेमक्या, अचूक शब्दांत व्यक्त करतात. ते असं,

'हाताचा मुटका गालावर ठेवून कल्याणी अंगणाला झाकणाऱ्या आकाशाकडे पहात राही, वाटतं आपली व्यथा झाकायला हे आभाळसुद्धा अपुरं पडलं. अकारण आलेलं उणेपण असं बेवारशासारखं उघडं पडलंय... दुर्दैवाला सुद्धा माझी भीती वाटते.'

शब्दबंबाळ न करता ज्योत्स्नाबाई कल्याणीचे दु:ख व्यक्त करू शकतात.

'घर गंगेच्या काठी' आणि 'कल्याणी' ह्या पहिल्या दोन कादंबऱ्यांतच ज्योत्स्ना देवधर हे नाव प्रकाशात आलं. पहिल्याच लेखनाला लोकांची इतकी दाद मिळावी याचं आश्चर्य ज्योत्स्नाबाईंनाही वाटल्यावाचून राहिलं नाही. कारण मराठीचे कोणतेही संस्कार नसताना हे यश त्यांनी प्राप्त करून घेतलं होतं. त्यांचे बालपण राजस्थानात, मारवाड प्रांतात गेलेलं. वरचसं शिक्षण हिंदी माध्यमातून झालेलं. वयाच्या सोळाव्या वर्षी लग्न झालं. गृहिणी म्हणून अनेक कौटुंबिक जबाबदाऱ्या पार पाडाव्या लागल्या. वयाची तिशी ओलांडल्यावर खऱ्या अर्थाने त्यांनी शिक्षणाला प्रारंभ केला. घरी-दारी, सासरी-माहेरी रूढार्थाने कुठलाही 'साहित्य वारसा' नव्हता. घरात, नातेवाईकांत, परिचितांत कोणीही लेखक, विचारवंत, वाचक, कलावंत नव्हतं. त्यामुळे वाचनाचे संस्कार झाले नाहीत. वातावरण साहित्यिक संस्कारांना पोषक नव्हतं. थोडक्यात काय, तर तरुणपणात लेखनासाठी प्रेरणा मिळावी असं घरात काहीही नव्हतं. आई, आजी जात्यावर कुणी ओव्या म्हणत नव्हत्या, कविता करत नव्हत्या. घरात वर्तमानपत्रं, पुस्तकं, मासिकं इत्यादी साहित्य वाचनासाठी मिळत नव्हतं. पण या साऱ्या नसण्यातूनही जे काही उत्तम प्रतीचं निर्माण झालं, त्याचं श्रेय ज्योत्स्नाबाई 'आकाशवाणी'ला, 'गृहिणी' ह्या कार्यक्रमाला देतात. आकाशवाणीमुळे त्या लिहू लागल्या. हिंदीकडून 'मराठी'कडे वळल्या. मराठीचे कोणतेही संस्कार नव्हते. राजस्थानातून मराठी प्रांतात आलेल्या मराठीतून शिक्षण नाही वाचन तर नाहीच नाही. 'आकाशवाणी'च्या निमित्ताने साहित्य क्षेत्रातील नामवंत मंडळी त्यांना भेटली. त्यामध्ये बा. भ. बोरकर, व्यंकटेश माडगूळकर, गोपीनाथ तळवलकर,



अनुक्रमणिका

मधुकर गोळवलकर अशा एकापेक्षा एक मोठ्या व्यक्ती होत्या. हिंदीकडून मराठीकडे येताना ज्योत्स्नाबाईंनी खूप मेहेनत घेतली. 'आकाशवाणी'च्या कृपेने त्यांच्यातील लेखिका वहराला आली. त्यांनी भरपूर मराठी वाचन केलं. कार्यक्रमाच्या निमित्तानं विविध क्षेत्रांतील ज्ञानवंतांशी चर्चा केल्या. त्यातूनच मराठी भाषेची गोडी निर्माण झाली. मराठी कवितांचं वाचन होऊ लागलं. मराठी कविता समजूही लागल्या. असे फार मोठे संस्कार वरोवर घेऊन ज्योत्स्नावाई लेखन क्षेत्रात उतरल्या.

कविवर्य वा. भ. बोरकर एकदा ज्योत्स्नाबाईंना म्हणाले होते, 'तुम्हाला आकाशवाणीत चांगला लौकिक मिळवायचा असेल तर आधी लेखक म्हणून समाजात नाव मिळवा.' ज्योत्स्नाबाई म्हणतात, 'त्यांचं हे वाक्य माझ्या मनावर कायमचं गोंदलं गेलं. माझ्या 'गृहिणी' कार्यक्रमाची मागणीच होती की, श्रोत्यांना कार्यक्रमाची ओळख नेमक्या, थोडक्या शब्दांत करून द्यायची. माझ्या अल्पाक्षरी, अर्थवहुल शैलीला ही मागणीच कारणीभूत ठरली.''[५]

'घर गंगेच्या काठी' आणि 'कल्याणी'च्या यशानंतर ज्योत्स्ना देवधरांनी आणखी काही कादंबऱ्या लिहिल्या. पण या लेखनाची संख्या मर्यादित आहे. भरमसाट नाही. विपुल कादंवरीलेखन त्यांनी केले नाही. कडेलोट (१९६९), चुकामूक (१९७०), कुँवरनी (१९७१), उत्तरयोगी (१९७३), वाळूचे फूल (१९७३), चिमणीचं घर मेणाचं (१९७५), ऐलतीर-पैलतीर (१९७६), पुतळा (१९७६), पडझड (१९७९), एक अध्याय (१९८०), वुटक्या सावल्या (१९८५), एक श्वास आणखी (१९८६), रमावाई (१९८९), उणे एक (१९८९), आक्रीत (१९९३) अशा एकूण सतरा कादंवऱ्या ज्योत्स्नावाईंनी लिहिल्या.

'मध्यमवर्गीय', 'सदाशिव पेठी' लेखिका असा शिक्का ज्योत्स्नावाईंच्या कादंवरीलेखनावर मारला गेला, पण तो त्यांना अजिवात मान्य नाही. ज्योत्स्नावाईंच्यावर असा शिक्का मारता येणार नाही. तसेच केवळ रंजन करणं, प्रेमाचा त्रिकोण, शारीरिक वर्णनं यात त्यांची कादंवरी गुरफटलेली नाही. वेगळे जग पण ज्योत्स्नावाईंनी दाखविले. 'घर गंगेच्या काठी' आणि 'कल्याणी' नंतर 'कुँवरनी'च्या निमित्ताने एक वेगळा विषय ज्योत्स्नाबाईंनी हाताळला. एका विलक्षण स्त्रीचे दर्शन घडवले आहे. घोड्यावरून रपेट मारायची, मनसोक्त पोहायचे, शिकारीला जायचे, मुलगी असूनही पुरुषाप्रमाणे वागायचे हे जिच्या नशिबी आले आहे, जिने आपले सौष्ठव गमावलेलं आहे, अशी राजकन्या रत्ना हे या कादंबरीतील केंद्रस्थानी असलेलं पात्र. अशा स्त्रीचे मन जेव्हा उमलू लागते, तेव्हा ते एका जीवघेण्या भोवऱ्यात सापडते. अशा विचित्र स्थितीत सापडल्यामुळे तिच्या वाट्याला आलेला एकाकीपणा, तिची व्यथा ज्योत्स्नावाई साकार करतात. एक अवघड विषय त्यांनी निवडला. त्याचप्रमाणे आधुनिक काळात स्त्री-पुरुष संबंधाला एक वेगळे वळण लागलेले आहे, हे ज्योत्स्नावाईंनी ओळखले. उच्च मध्यमवर्गीय कुटुंबातील बदलत्या नात्याचा ताण त्यांच्या लक्षात आला. आधुनिक काळातील 'स्त्री' चूल मूल तर सांभाळतेच पण अर्थार्जनही करते आणि हे सर्व करताना, नवरा आणि मुले यांची मनं सांभाळत असताना तिची जी ओढाताण होत असते, त्याचा शोध घ्यावा, असं त्यांना वाटलं.

'वाळूचं फूल', 'एक अध्याय', 'उणे एक', 'एक श्वास आणखीन', पडझड', 'वुटक्या सावल्या', ऐलतीर-पैलतीर' इत्यादी कादंवऱ्यातून ज्योत्स्नाबाई स्त्रीची वेगवेगळी रूपं रंगवतात. स्त्री मनाचे वारीक-सारीक कंगोरे दाखवतात. प्रियकर-प्रेयसी, पती-पत्नी, आई-मुलगा अशा वेगवेगळ्या नात्यातून स्त्री-जीवनात निर्माण होणाऱ्या समस्या अत्यंत समर्थपणे उलगडून दाखवतात. त्याचप्रमाणे उद्ध्वस्त होणारे घर आणि त्यामागची कारणे त्या शोधतात. ज्योत्स्नाबाईंनी जे पाहिलं, अनुभवलं ते वाचकांच्या पुढे सादर केलं. ज्योत्स्नाबाई एकत्र कुटुंवात वाढल्या. त्यांनी प्रवास पुष्कळ केला. 'आकाशवाणी'च्या नोकरीच्या निमित्ताने त्यांना असंख्य स्त्रिया भेटल्या. वाचनातून, चिंतनातून त्या प्रगट झाल्या. स्वत:च्या आयुष्याबद्दल, लेखनाबद्दल चिंतन करत असताना ज्योत्स्नाबाई म्हणतात, 'कोवळ्या, अजाण, अपरिपक्व अशा वयात कौटुंबिक कारणांनी मी करपून गेले. काळज्या, जागरणं, आजारपण, कष्ट यांत आयुष्याची सोनेरी वर्षं खर्ची पडली. मला वाटतं, माझ्या लेखनाला करुणेचा घाट मिळाला, त्याची रुजवात या कठीण परीक्षेच्या, मनस्तापाच्या, दु:ख-यातनांच्या, कष्टाच्या काळात झाली असावी. एकत्र कुटुंबातील उन-पाऊस अंगावर घेत असल्यामुळे माझ्या लेखनाला कौटुंविक चौकट आपोआप मिळाली.[१]'

कोणत्याही कारणांमुळे घराच्या घरपणाला तडा गेला तर फक्त 'भिंती' उरतात. नातेसंवंधात किंचित सुद्धा ओलावा राहात नाही आणि मग प्रत्येकाचे एक स्वतंत्र जग

**डॉ. विनया डोंगरे**

शिक्षण : एम्. ए., पीएच्. डी. (१९८०)

'द्वितीय महायुद्धोत्तर मराठी कादंबरीचे स्वरूप आणि चिकित्सा'

मार्गदर्शक : डॉ. भालचंद्र फडके

१) 'खांडेकरांच्या कादंबऱ्या आदर्श आणि वास्तव'

या विषयावर साहित्य संमेलनाचा प्रथम क्रमांकाचा पुरस्कार.

२) अखिल भारतीय मराठी नाट्यपरिषदेतर्फे दिला जाणारा अनंतराव वर्वे स्मृती पुरस्कार एकूण दोन वेळा.

३) महाराष्ट्रीय कलोपासक या नाट्यसंस्थेतर्फे दिला जाणारा भगवान पंडित पुरस्कार एकूण चार वेळा.

४) कुसुम मनोहर लेले या नाटकातील निवंध स्पर्धेत प्रथम क्रमांकाचा पुरस्कार.

५) पु. भा. भावे पुरस्कार.

६) 'रावसाहेव' चित्रपटावर आधारित प्रसंग लेखनस्पर्धा : द्वितीय क्रमांकाचा पुरस्कार.

या व्यतिरिक्त आणखी काही छोटे पुरस्कार.

सध्या साहित्यप्रेमी भगिनी मंडळातर्फे 'स्त्री साहित्याचा समीक्षात्मक शोध' या प्रोजेक्टमध्ये 'कादंबरी' या विषयावर काम चालू आहे.

पुणे फ्लॅश तर्फे इंटरनेटवर 'पंधरवडा' हे पाक्षिक चालते. त्यामध्ये नियमित लेखन.



अनुक्रमणिका






तयार होते. कोणीच कुणाचं राहात नाही. चौकोनी कुटुंबात चार दिशांना चार तोंडे होतात आणि भयानक एकटेपणाचा भोग भोगावा लागतो.

'बुटक्या सावल्या'मधील नायक पद्मनाभ. उत्तम लेखक, ज्ञानपीठ पुरस्कार मिळवलेला. पण कौटुंबिक जीवनात अयशस्वी. कुटुंबाशी किंचितसुद्धा सूर जुळलेला नाही. पद्मनाभच्या बायकोची व्यथा वेगळीच आहे. ती म्हणते, 'मला काहीच नकोय ! मान-मरातब, कौतुक सगळं त्यांना मिळू दे. खरं सांगू ! मला त्या गोष्टींचाही कंटाळा आलाय. एखाद्या गरीब सामान्य माणसाची बायको झाले असते तर हार-तुरे नसते मिळाले, पण माझी मुलं माझ्याजवळ राहिली असती.'

'एक श्वास आणखी'मधील मृणालला मरताना सोबतीला एक श्वास हवाय, तिच्या श्वासाशी जुळणारा ! मृणालचा सूर जमत नाहीये ! तिची ओढाताण होतेय, एकलेपण छळतंय. वैतागून ती उद्‌गारते, 'का? आपण वेटर आहोत? घरगडी आहोत? केवळ स्त्री म्हणून लादलेली कामं आपण पिढ्यान् पिढ्या करत राहायची? का म्हणून...?'

'ऐलतीर-पैलतीर'मधील नायिका म्हणते, 'माझ्या आजीच्या तोंडी नेहेमी 'प्रारब्ध' हाच शब्द असायचा. ती म्हणायची, 'तुझा बाईचाच जन्म आहे. तुझी माती बाईचीच आहे, प्रारब्ध तुला काही विसरणार नाही.'

'पुतळा'मधील सुनीता म्हणते, 'रात्री तो जितका मृदू, कोमल, आर्जवी असायचा तितकाच दिवसा उर्मट, बेपर्वा, स्वार्थी, पझेसिव्ह. मला ते मान्य नव्हतं. पुरुषी वृत्ती, पुरुषपण हे त्याच्या रक्ताच्या थेंबाथेंबात मुरलं होतं. सोसलं... शेवटी सोडलं.'

अशा प्रकारे या स्त्रिया आई म्हणून, पत्नी म्हणून, प्रेयसी म्हणून झगडत राहतात. वास्तवाचा स्वीकार करून त्याला तोंड देण्याचा प्रयत्न करतात, पण शेवटी त्या एकट्या राहतात. वाट्याला आलेले एकटेपण मान्य करून गप्प बसतात. परिस्थितीशी झगडणारी स्त्री ज्योत्स्नाबाईंच्या अनेक कादंबऱ्यांतून दिसते.

'पडझड' कादंबरीतील कुमुद देखील आपल्या कुटुंबाला दोन्ही हातांनी सावरू पाहात असताना स्वत:शी आणि कुटुंबीयांशी झगडते. 'कल्याणी' कादंबरीत कल्याणीची सासू म्हणते, 'वासुदेवा, या घरात घरच्या लक्ष्मीचा नेहेमीच छळ होत आलाय रे !' तर इंदोरला येताना कल्याणीची आई म्हणते, 'कन्नू बेटा, बाईच्या जातीला खूप खूप गिळून टाकावं लागतं. गिळताना स्वत:ला सुद्धा कळू नये इतक्या सवयीनं ते सर्व होतं. सुखी हो बेटा ! दुर्दैवाने नाहीच सुखी झालीस तर एकटीच सोस. या जगात स्त्रीला कोणीच मदत करत नाही.'

अशा प्रकारे अनेक सोशिक स्त्रिया ज्योत्स्नाबाईंच्या कादंबऱ्यांतून साकार झाल्या. त्यांच्या कथा आणि व्यथा बोलक्या झाल्या.

दीर-भावजय यांच्यामधील नाते आणि त्याचा वेगवेगळ्या पातळीवरून विचार करण्याचा प्रयत्न ज्योत्स्नाबाई आवडीने करतात. 'घर गंगेच्या काठी'मधील जानकी घरात आल्याबरोबर गंगाधरभावजींच्या अहंमन्य आणि दुष्ट स्वभावामुळे झगडते. मात्र छोटा दीर आणि भावजय



अनुक्रमणिका

यांच्यामधील शुद्ध प्रेमाचे नाते ज्योत्स्नाबाई आवर्जून चित्रित करतात. पण थोरल्या जावेने प्रेमाने आपल्या धाकट्या दिरासाठी स्वेटर विणला, तर थोरल्या दिराने तो चुलीत फेकला. थोरली जाऊ जानकीजवळ ही कथा सांगते.

ज्योत्स्नाबाईंनी आपल्या अनेक कादंबऱ्यांमधून धाकटा दीर आणि भावजय यांचे उत्कट नाते रंगवले आहे. खरं सांगायचं तर या नात्याचे त्यांना खूप आकर्षण आहे. या संदर्भात ज्योत्स्नाबाई म्हणतात, 'हा शरदबाबूंचा, हिंदीचा परिणाम आहे. हिंदीत हे नातं नाजूकपणे, पवित्रपणे रेखाटलेले दिसते. आपला पती कसा असावा, याची स्वप्न मी रंगवलेले नव्हती, कारण माझं लग्न लवकर झालं होतं. पण आपल्याला धाकटा दीर असावा, तो कसा असावा याच्या मात्र काही कल्पना होत्या. प्रत्यक्ष जीवनात मला धाकटा दीर मिळाला नाही. म्हणून ती भूक मी माझ्या लेखनातून भागवली.

'एक अध्याय' या कादंबरीतील सदानंदची बायको साधना म्हणते, 'सदानंदचा स्वाभिमान मला आवडला. मला तो 'हिरो'च वाटला. त्याला धाकटा भाऊ आहे. शरदबाबूंच्या कादंबऱ्या वाचून माझ्या मनात धाकट्या दिराबद्दल ओढ निर्माण झाली. छानशी 'वहिनी' व्हायचं होतं मला.'

'एक श्वास आणखी' ही कादंबरी म्हणजे मृणालचे आत्मशोधन आहे. मृणाल म्हणते, 'मला तर अलीकडे वाटू लागलंय मीच एक सायकॉलॉजिकल केस आहे. घरच्या माणसांपासून मला जे मिळत नाही, ते मी बाहेरची माणसं जोडून मिळवू पाहतेय. वाटतं एक धाकटा दीर दत्तक घ्यावा. जो खूप हुशार असेल, खेळकर असेल. त्याच्याबरोबर लांब लांब फिरायला जावे, नाना विषयांवर गप्पा माराव्या, चर्चा करावी.'

'रमाबाई' या कादंबरीत ज्योत्स्नाबाईंनी नणंद-भावजय नाते रंगवलंय. 'रमाबाई' कादंबरीच्या मनोगतात त्या म्हणतात, 'रमाबाई, मी तुमच्यावर खूप प्रेम केलं. म्हणून माझी माया, माझी तुमच्या विषयीची कळकळ, माझा स्नेह तुम्हाला देण्यासाठी मी एक पात्र निर्माण केलं, तुमची थोरली वहिनी. तिला नाव दिलं राधावहिनी. ही तुमच्या श्रीनिवास दादाची बायको. तुमच्या दादानं लग्न केलं, पण बायको टाकून दिली. एवढा सत्याचा आधार राधा वहिनींच्या निर्मितीला पुरेसा होता. या वहिनीला अधिकार दिला तुमच्या चुका सांगण्याचा, तुमच्या दोषांवर बोट ठेवण्याचा, तुम्हाला मायेनं चार गोष्टी करायला लावण्याचा. पण रमाबाई तुम्ही आपल्या स्वभावाला मुरड घातली नाही. या थोरल्या वहिनीचं ऐकलं नाही. तिला रमाबाई साहेबांच्या बरोबर पुण्याला पाठवून एकट्या केडगाव स्टेशनवर ठामपणे उभ्या राहिल्या.'

अशा प्रकारे 'वहिनी' ह्या नात्याबद्दल ज्योत्स्नाबाईंच्या मनात खरंखुरं प्रेम होतं. कादंबरीलेखनातून तर ते स्पष्ट झालंच, पण आकाशवाणी वरच्या 'गृहिणी' कार्यक्रमात पण त्या सर्व भगिनींच्या 'वहिनी'च होत्या. कादंबरीलेखनातही त्यांनी जपलेले हे 'वहिनी'चे नाते निश्चितच अकृत्रिम आहे.

ज्योत्स्नाबाईंच्या कादंबरीलेखनाबद्दल परस्परविरोधी प्रतिक्रिया व्यक्त होताना दिसतात.

काही समीक्षकांनी त्यांच्या लेखनाचे खूप कौतुक केले, तर काहींनी 'सदाशिव पेठी' असल्याचा शिक्का मारला. पण हा शिक्का ज्योत्स्नाबाई अमान्य करतात. ज्योत्स्नाबाईंचे संस्कार राजस्थान, मारवाड प्रांतातले आहेत, त्यामुळे 'सदाशिव पेठी'त त्यांचे लेखन बसत नाही.

पण एक मात्र खरे की, 'घर गंगेच्या काठी', 'कल्याणी' या कादंबऱ्यांमुळे ज्योत्स्ना देवधरांचे नाव झाले. 'कुँवरनी'तून एका वेगळ्याच विषयाला हात घातला. 'उत्तरयोगी', रमाबाई' यांसारख्या कादंबऱ्यांची रचना करताना त्यांनी खूप अभ्यास केला, खूप मेहनत घेतली. विषयाचे, भाषेचे, मांडणीचे वेगळेपण सिद्ध केले. आधुनिक स्त्रीची होणारी ओढाताण, अनेक भूमिका बजावताना तिच्यावर येणारा ताण, तिच्या वाट्याला येणारे एकाकीपण आणि सर्व नाती सांभाळता सांभाळता तिची होणारी फरपट अतिशय समर्थपणे साकार केली.

ज्योत्स्नाबाईंच्या कादंबऱ्यांचा 'कथाविषय' चांगला असतो. पण काही वेळा कलात्मकतेच्या दृष्टीनं त्या कमी पडतात, असं वाटतं. 'ऐलतीर-पैलतीर', 'पुतळा', 'बुटक्या सावल्या' इत्यादी कादंबऱ्या उदाहरणादाखल घेता येतील. काही वेळा तीच ती पात्रे आपण पुन्हा पुन्हा पाहतो आहोत, असंही वाटतं. कथावस्तूचा विकास झाला आहे, असं वाटत नाही. काही रचनादोष जाणवतात. तोच तोपणा वाटायला लागतो. 'आक्रीत' आणि 'एक श्वास आणखी' या कादंबऱ्यांतील कथाविषय मात्र अतिशय चांगल्या पद्धतीने हाताळलेले आहेत.

ज्योत्स्ना देवधरांच्या कादंबऱ्यांची समीक्षा करताना डॉ. अशोक कामत म्हणतात, 'ज्योत्स्नाबाईंचं वैशिष्ट्य ठरलं ते आधुनिक जीवनातील झपाट्याने पालटलेल्या जीवनमूल्यांची संगती लावण्याची त्यांची क्षमता.[७]

प्रभावी कथावस्तू आणि विषयाची आटोपशीर मांडणी यामुळे ज्योत्स्नाबाईंच्या कादंबऱ्या वाचल्या गेल्या. लेखनात फापटपसारा नाही, आकारमान बेताचे हे वैशिष्ट्य !'

यशाचं रहस्य कोणतं? या प्रश्नाला उत्तर देताना ज्योत्स्नाबाई म्हणतात, 'मी खूप जिद्दी, कष्टाळू आहे. 'रमाबाई' ही कादंबरी मी तीन वेळा लिहिली. लेखनातील यश जगायला आधार ठरलंय ![८]''

योगी अरविंदांवरची 'उत्तरयोगी' आणि 'रमाबाई' ह्या दोन कादंबऱ्या आनंददायी ठरल्या. ह्या कादंबऱ्या लिहिण्यासाठी ज्योत्स्नाबाईंनी खूप श्रम घेतले होते, मेहनत केली होती, अभ्यास केला होता. एकूण कादंबरीलेखनाचा प्रवास बघितला तर कथाविषयाचे वेगळेपण आणि विकास लक्षात येतो. ह्या लेखनामागे भाबडेपणा आहे, उत्कट भक्तिभाव आहे. या दोन कादंबऱ्यांबद्दल बोलताना ज्योत्स्नाबाई म्हणतात, 'माझ्या ह्या प्रवासात 'उत्तरयोगी' ही कादंबरी अश्रूपासून अध्यात्मापर्यंतची चाल आहे. माणसाला भोगवटा भोगावाच लागतो. मलाही भोगावा लागला. पण योगी अरविंदांचा आधार मिळाला. माँच्या आशीर्वादानं वेड लागू दिलं नाही... नंतर आणखी एक थांबा... रमाबाई. अश्रूंच्या सरीत आत्मतेजानं झळाळून उठलेली माझी नायिका !''[९]

'उत्तरयोगी'तून अरविंदांच्या विभूतीचे दर्शन घडते. कोणत्याही तऱ्हेचा पाल्हाळ या लेखनात

नाही. योगी अरविंदांच्या जीवनातील अनेक घटना समर्थपणे हाताळल्या आहेत. योगी अरविंदांचे मोठेपण वाचकांपर्यंत उत्कटतेने पोचवण्यात, लोकविलक्षण असे जीवन साकार करण्यात ज्योत्स्नाबाई निश्चितच यशस्वी झाल्या आहेत. तुरुंगवासातून बाहेर पडल्यानंतर अंतर्बाह्य बदललेले योगी अरविंद चित्रित करतात. 'उत्तरयोगी' या कादंबरीच्या आधी दादा धर्माधिकारी यांचे एक पत्र छापलेले आहे. ते निश्चितच लक्षणीय आहे. दादा धर्माधिकारी आपल्या पत्रात म्हणतात, 'तुम्हाला अरविंद कळला आहे की नाही, हे मला नाही सांगता येणार. कारण मलाच अरविंदांचे आकलन नीटसे कोठे झाले आहे? पण अरविंदांची स्वगते, सरोजिनी व इतर मंडळींशी त्यांची झालेली चर्चा आणि सावित्री, वैदिक जीवन या ग्रंथावरील अरविंदांनी तुमच्या पुस्तकात केलेले विवेचन वाचल्यावर माझ्यापेक्षा अरविंद तुम्हाला नक्कीच कळले आहेत, असे मी विनदिक्कत म्हणू शकतो.[१०]''

रमाबाईंच्या निमित्तानं एका वादळी व्यक्तिमत्त्वाचा वेध ज्योत्स्नाबाईंनी घेतलेला आहे. ही कादंबरी त्यांच्या साहित्य प्रवासात महत्त्वाची तर ठरलीच, पण लेखनाचे समाधान त्यांना खूप मिळाले. त्यामागे त्यांची खूप मोठी तपश्चर्या होती. या कादंबरी लेखनासाठी ज्योत्स्नाबाईंनी खूप वाचन केलं. १९ व्या शतकातील भाषेच्या दृष्टीने ते उपयुक्त ठरले. 'एका आयुष्यात अनेक आयुष्यं जगलेल्या रमाबाईंच्या कारुण्यमय जीवनाचे आकर्षण ज्योत्स्नाबाईंना पहिल्यापासूनच वाटत आलंय. जवळच्या सर्व व्यक्तींचे मृत्यू रमाबाईंनी सोसले. किंबहुना समाजाला, परिस्थितीला आणि दैवालाही तोंड दिलं. एवढेच नव्हे तर, त्यातूनही समाजकार्य सुरू ठेवले. रमाबाईंचे प्रचंड दुःख, धडपड, अडीअडचणी यांचे चित्रण करणं हे ज्योत्स्नाबाईंनी आव्हान म्हणून स्वीकारलं आणि लीलया पेललं.[११]

रमाबाईंच्या नाट्यमय जीवनानं ज्योत्स्नाबाईंना पछाडलं होतं. झुंज देणं हेच जिचं आयुष्य आहे, ती कशाच्या बळावर या दुष्टचक्रातून बाहेर पडली असेल? संघर्षमय आयुष्याला ही रमाबाई कशी सामोरी गेली असेल? असं त्यांना वाटत होतं. त्यांचं मन सारखा रमाबाईंचाच विचार करीत होतं. ज्योत्स्नाबाई म्हणतात, 'दुःख, संकटं, उपासमार, आपत्ती, लोकनिंदा, अडचणी, विरोध अशा सगळ्या दुर्दैवानं यमानं आपल्या पाशानं आणखी गडद केलेलं हे लोकविलक्षण आयुष्य मला सतत 'हाक' घालत राहिलं. ते हिरकणीसारखे डोळे, घट्ट मिटलेले ओठ, भव्य कपाळ आणि मनस्वी व्यक्तिमत्त्व मला भुरळ घालीत राहिलं. [१२]

अशा ह्या व्यक्तिमत्त्वाचा शोध ज्योत्स्नाबाईंना घ्यायचा होता. मनात घर करून राहिलेली शोकनाट्याची नायिका 'कादंबरी' या साहित्य प्रकारातून रंगवायची होती. सतत वाचन, पुनर्लेखन अशा परिश्रमांतून ह्या साहित्यकृतीने आकार घेतला आणि वाचकांना समाधान दिले. चरित्र आणि कादंबरी हे दोन्ही साहित्यप्रकार एकमेकात मिसळून गेले आहेत आणि रमाबाईंच्या अंतरंगाचा वेध घेण्याचा प्रयत्न प्रशंसनीय ठरला आहे. पंडिता रमाबाई ही महाराष्ट्राचे भूषण ठरलेली एक अलौकिक स्त्री, मनस्विनी सर्वार्थांनी साकार झाली आहे. ज्योत्स्नाबाई म्हणतात, 'चरित्रात जेजे सगळं देता येतं, ते मला कादंबरीच्या रूपात कोंबायचं नव्हतं. मला तुमच्यातली

स्त्री हवी होती. या स्त्रीचं खंबीर, शहाणं, बुद्धिवादी, कर्तृत्ववान मन मला धुंडाळायचं होतं. तुमच्या अफाट सोशिकपणाची, मनस्वी, हट्टी, हेकेखोर स्वभावाची नाडी, तिचे ठोके अनुभवायचे होते. तुमच्या अंगभूत सामर्थ्याची गुरुकिल्ली कोणती ते हुडकायचं होतं. तुमच्या हातांना करुणेची बोटं लाभली होती, तो स्पर्श मला हवा होता.[१३]

अशा प्रकारे रमाबाईंच्या आयुष्यात अनेक थक्क करणाऱ्या घटना आहेत, त्यांचा शोध ज्योत्स्नाबाईंना घ्यायचा होता आणि त्यांनी तो यथायोग्यपणे घेतलेले आहे. रमाबाईंवरील कादंबरीलेखनानं ज्योत्स्नाबाईंना खूप समाधान दिलं. या कादंबरीला कलकत्त्याच्या भारतीय भाषा परिषदेचा पुरस्कारही मिळाला. 'रमाबाई' प्रसिद्ध झाल्यानंतर कविवर्य कुसुमाग्रज यांचं अभिप्राय व्यक्त करणारं एक पत्र ज्योत्स्नाबाईंना आलं. पत्रात ते म्हणतात, 'केडगावच्या फलाटावर एकटी उभी असलेले रमाबाई अद्याप डोळ्यांसमोर उभी आहे, तिच्या सर्व यातनांसह, अभेद्य निष्ठांसह आणि भेदक निळ्या डोळ्यांसहही ! काही ठिकाणी आवश्यक दुवे तुटलेले वाटतात, कोठे ती चरित्राकडेही वळते. पण हे गौण आहे. तुमच्या मनातील हाक तुम्ही वाचणाऱ्यांच्या मनापर्यंत पोचवली आहे, यात शंका नाही. या कथेत 'विचारांचा' भागही अपरिहार्यपणे महत्त्वाचा, तोही तुम्ही समर्थपणानं, पण क्लिष्ट होऊ न देता कथेत गुंफला आहे. तुमचा शोध सफल झाला आहे आणि आधुनिक महाराष्ट्राच्या इतिहासातील एक तेजोमय, अद्‌भुत व्यक्तिमत्त्व तुम्ही कायमचं सजीव करून ठेवलं आहे.'

ज्योत्स्नाबाईंवरोबर त्यांच्या कादंबरीलेखनावर चर्चा चाललेली असताना, गप्पांच्या ओघात श्री. नारायण महाडिक यांच्या 'कैदी नं. ३१४६७' या पुस्तकाचा विषय निघाला, तेव्हा त्या पुस्तकाच्या लेखनामागची एक वेगळीच कथा ऐकायला मिळाली.

'कैदी नं. ३१४६७' हे नारायण महाडिक यांचे 'आत्मकथन' आहे. महाडिक यांना खुनाच्या आरोपावरून जन्मठेपेची शिक्षा झालेली होती. त्यांचे शिक्षण बेताचेच होते. पण नाटकाचे पडदे रंगवणे, मूर्ती तयार करणे इत्यादी कलांची या माणसाला आवड होती. 'आकाशवाणी'च्या कार्यक्रमाच्या निमित्ताने ज्योत्स्नाबाई येरवड्याला गेल्या. तिथं महाडिकशी गप्पा झाल्या. ध्वनिमुद्रण झालं. महाडिकनं गावंढळ भाषेत आपली आत्मकथा सात-आठ पानांमध्ये लिहून दिली. हे लेखन छापण्याच्या दृष्टीनं पुरेसं नव्हतं. पण त्या थोड्या मजकुरामध्ये कलात्मक भर घालून त्या मजकुराला ज्योत्स्नाबाईंनी कादंबरीचा आकार दिला. १९७३ ला 'माणूस' च्या दिवाळी अंकात ही कादंबरी प्रसिद्ध झाली. ती खूप गाजली. लोकांना फार आवडली. नारायण महाडिकचे अनुभव जिवंत होते, पण तो स्वत: अशिक्षित असल्याने 'लेखनशैली' वगैरे त्याच्याजवळ नव्हती. ते काम ज्योत्स्नाबाईंनी केलं आणि एक चांगली कादंबरी लोकांपुढे आली.

त्यानंतर ह्या घटनेला कलाटणी देणारा एक प्रसंग घडला. एका नामवंत प्रकाशकांनी ज्योत्स्नाबाईंना असं सुचवलं, की ही कादंबरी आपण नारायण महाडिकच्या नावावरच प्रसिद्ध करू, म्हणजे एका चांगल्या 'आत्मचरित्रा'ची भर 'आत्मचरित्र' या वाङ्मयप्रकारात पडेल.

लेखक म्हणून महाडिक प्रकाशात येईल आणि त्याच्या ह्या आत्मकथेला एखादा पुरस्कारही मिळून जाईल. त्या वेळी ज्योत्स्नाबाईंनी अत्यंत भावडेपणाने ह्या गोष्टीला होकार दिला. ज्योत्स्नाबाईंची संमती मिळाल्यानंतर पुढे हे आत्मचरित्र नारायण महाडिकच्या नावावर प्रसिद्ध झाले. पण ह्या पुस्तकाची अजिबात दखल घेतली गेली नाही. कदाचित पुस्तकावर असलेल्या नावामुळेही हे घडले असेल. कोणतंही बक्षीस या पुस्तकाला मिळालं नाही. ह्या गोष्टीबद्दल ज्योत्स्नाबाईंना आजही खूप चुटपूट वाटते. इतके परिश्रम घेऊन केलेलं लेखन आपल्या हातून निसटलं, याची खंत वाटते. ज्योत्स्नाबाईंच्या नावावर पुष्कळ पुस्तकं आहेत. ह्या पुस्तकामुळे आणखी एका पुस्तकाची भर पडली असती, कदाचित नावामुळे पुरस्कार मिळूनही गेला असता. स्वतः तयार केलेली, स्वतंत्र शैलीचा वापर असलेली एक चांगली कलाकृती केवळ भावडेपणाने घेतलेल्या निर्णयामुळे आपल्या हातची गेली, याची आजही ज्योत्स्नाबाईंना खंत वाटते. कोणताही लेखक लेखनासाठी काही ना काही आधार घेतच असतो. एखादी ऐतिहासिक कादंबरी लिहिताना जसा ऐतिहासिक कागदपत्रांचा उपयोग केला जातो, तसा वापर ज्योत्स्नाबाईंनी महाडिकच्या मजकुराचा केला होता आणि स्वतंत्र शैलीचा वापर करून कलात्मक आकार दिला होता. पण आजही भावडेपणाने घेतलेल्या या निर्णयाबद्दल ज्योत्स्नाबाईंना रुखरूख वाटते.

ज्योत्स्नाबाईंच्या कादंबरी लेखनाचा प्रवास बघितला तर त्यांची 'भाषाशैली' ठळकपणे नजरेत भरते. भाषाशैली चित्रमय आहे, त्यामुळे प्रसंग जसाच्या तसा उभा करण्याचे सामर्थ्य तिच्यामध्ये आहे.

स्त्री-सुलभ, साधी, सरळ, सोपी, अर्थवाही भाषा ज्योत्स्नाबाई वापरतात. ही भाषा हे ज्योत्स्नाबाईंचे फार मोठे बळ आहे, असे म्हणायला हरकत नाही. अशी ही अर्थवाही, सूत्रमयी भाषा हेच त्यांचे वैशिष्ट्य आहे. नेमक्या शब्दांत विचार मांडण्याचे आणि सूत्ररूप लेखन करण्याचे श्रेय ज्योत्स्नाबाई 'आकाशवाणी'ला देतात. त्या म्हणतात, 'आकाशवाणी'वर काम केल्यामुळे सेकंदा सेकंदाचा हिशोब करण्याची सवय लागली आणि मोजक्या शब्दांत बरंच काही व्यक्त केलं जाऊ लागलं. श्रोत्यांना कार्यक्रमाची ओळख थोडक्या शब्दात करून द्यावी लागायची. अल्पाक्षरी, अर्थबहुल शैलीला ही मागणीच कारणीभूत ठरली. त्याचप्रमाणे हिंदी भाषेचा हळुवारपणा, उर्दूची नजाकत आणि मराठीचं थोरपण आपल्या भाषेला लाभलं असंही ज्योत्स्नाबाईंना वाटतं.

ज्योत्स्नाबाईंच्या लेखणीला वाक्प्रचार - म्हणींचे पण जबरदस्त आकर्षण आहे. हाच मराठी भाषेचा 'ठेवा' आहे, असंही त्यांना वाटतं. 'रमाबाई' या कादंबरीत रमाबाईंच्या वहिनीच्या तोंडी खूप प्रमाणात वाक्प्रचार आणि म्हणी आहेत.

भाषाशैलीचे अनेक नमुने 'कल्याणी' आणि 'घर गंगेच्या काठी'मध्ये दिसतात. कल्याणीच्या उदासवाण्या घराचे वर्णन करताना ज्योत्स्नाबाई म्हणतात, ''हळदी कुंकवाची पावलं उमटवीत येथे सुना आल्या. शेवटी स्वतःचीच पावलं त्यांना ओळखू येईनात.' किंवा 'श्रीमंताघरच्या

मुली मोतीचुरा उधळीत या वाड्यात आल्या, पण कुणाला मणीमंगळसूत्र काही सांभाळता आलं नाही. दिवाळीसारखा मोठा सण पुरुषांच्या अंगाला साईसारखी वोटे न लागता तसाच खालच्या मानेनं मुकाट निघून जाई.' बालविधवा होऊन माहेरी आलेल्या आत्याचं चित्र ज्योत्स्नाबाई असं रेखाटतात - 'दारात महिरपीसारखी आत्या उभी होती. सोनचाफ्याचं तेज होतं तिच्या चेहेऱ्यावर.'

'घर गंगेच्या काठी'मध्ये देखील सूत्रमय आणि नेटक्या वाक्यांची पखरण कादंबरीभर आहे. 'मनुष्य वयानं थकत नाही, मनाविरुद्ध वागण्यानं थकतो' किंवा 'दळता दळता अचानक जात्याचा दांडाच हाती यावा, अशी अवस्था झाली माझी' किंवा 'एकेका माणसाला त्याच्या दुष्टपणाचंच बळ मिळतं आणि एकेकाला त्याच्या चांगुलपणामुळेच दुबळेपणा येतो की काय कोण जाणे'' अशी कितीतरी सूत्रमयी वाक्यं जागोजाग पेरलेली आहेत. पुन्हा भाषा संवेदनशील आहे. ती तिची सहज प्रवृत्तीच आहे.

असा हा ज्योत्स्नाबाईंच्या कादंबऱ्यांचा प्रवास आहे. विविध संस्कारांनी हे कादंबरीलेखन झालेलं आहे. लेखनावर ज्यांचे संस्कार झाले, ज्यांचा ठसा उमटला, त्यांचं 'ऋण' ज्योत्स्नाबाई मान्य करतात. 'कृतज्ञता' व्यक्त करायचा प्रयत्न करतात. त्यांनी आत्तापर्यंत केलेल्या साहित्य सेवेतून जे पैसे जमा झाले, ते त्यांनी फार वेगळ्या तऱ्हेने वापरले. पुण्याच्या महाराष्ट्र साहित्य परिषदेकडे ज्योत्स्नाबाईंनी पन्नास हजार रुपये 'ठेव' म्हणून ठेवले. ह्या रकमेतून दरवर्षी एका लेखिकेला उत्कृष्ट साहित्यकृतीबद्दल पाच हजार रुपयांचा पुरस्कार देण्यात येतो. हा पुरस्कार ज्योत्स्नाबाईंनी शरदबाबूंच्या नावाने ठेवला आहे. स्वत:च्या मिळकतीतून दुसऱ्याच्या नावाने हा पुरस्कार ठेवण्याचा प्रकार निश्चितच अभिनव आहे. अर्थातच यामुळे पुरस्कारला 'आंतर भारतीय' स्वरूप प्राप्त झालं, असं ज्योत्स्नाबाईंना वाटतं. स्वत:ला मिळालेल्या पुरस्कारातूनच दुसऱ्याला पुरस्कार देण्याच्या उपक्रमाबद्दल ज्योत्स्नाबाई म्हणतात, 'गंगेच्या पाण्यात उभं राहून, गंगेच्या पाण्यानीच गंगेला 'अर्घ्य' द्यावं तसा हा प्रकार आहे.' शरदबाबूंचे संस्कार जपतजपतच ज्योत्स्नाबाईंनी साहित्य निर्मिती केली. कृतज्ञता व्यक्त करण्याचा हा आगळावेगळा प्रकार ! ही कृतज्ञता ज्योत्स्नाबाईंना आणखी एका प्रकाराने व्यक्त करायची आहे. शरदबाबूंचे संस्कार सिद्ध करणारी म्हणजेच शरदबाबूंप्रमाणेच एक चांगली कादंबरी लिहिण्याचा त्यांचा मानस आहे. ज्योत्स्नाबाईंचा हा संकल्प सिद्धीस जावो, हीच त्यांच्या पंचाहत्तरीच्या निमित्ताने शुभेच्छा!

संदर्भ :

१) ज्योत्स्ना देवधर, 'घर गंगेच्या काठी' म. सा. प. अंक २५१, दिवाळी १८९, पृ. १०६
२) ज्योत्स्ना देवधर, 'नाट्यदर्पण', १९९४
३) प्रा. निशिकांत मिरजकर, 'माणूस', ९ नोव्हेंबर, १९६८
४) ज्योत्स्ना देवधर, म. सा. प. अंक २५१, दिवाळी, १९८९
५) ज्योत्स्ना देवधर, 'आरती' दिवाळी अंक, १९९५











६) ज्योत्स्ना देवधर, 'आरती' दिवाळी अंक, १९९५
७) डॉ. अशोक कामत, 'लोकमान्य लेखिका', 'रविवार केसरी', २७ फेब्रुवारी, २०००
८) ज्योत्स्ना देवधर, 'पुढारी', रविवार, १९ एप्रिल, १९९२
९) ज्योत्स्ना देवधर, 'मनोगत'
१०) दादा धर्माधिकारी, 'पत्रलेखन', 'उत्तरयोगी', दुसरी आवृत्ती, १९८६
११) प्रज्ञा जांभेकर, 'स्वयंभू तपस्विनी ज्योत्स्ना देवधर' लोकमत, २४ फेब्रुवारी, २०००
१२) ज्योत्स्ना देवधर, 'रमाबाई', मनोगत, दुसरी आवृत्ती, १९९२
१३) ज्योत्स्ना देवधर, 'रमाबाई', मनोगत, दुसरी आवृत्ती, १९९२

□

डॉ. विनया डोंगरे
९६ डी/२ बी, दीक्षित बाग, नवी पेठ, कॉलनी नर्सिंग होमजवळ, पुणे ४११ ०३०.

---

संपादक, महाराष्ट्र साहित्य पत्रिका यांस,

पत्रिकेच्या ऑक्टोबर ९९, मार्च २००० चे अंकातील ग्रामीण बोलीचे काही विशेष हा डॉ. गो. मा. पवार यांचा लेख वाचला.

डॉ. पवार यांचा या विषयावरील अधिकार मान्य करूनही त्यांनी सुचवलेल्या काही व्युत्पत्ती सदोष वाटतात.

'अक्कडबाज', 'आखडू' या शब्दांचा उगम त्यांनी मेसोपोटेमियातील अक्केडियन संस्कृतीशी भिडवला आहे. तो फार ताणलेला वाटतो.

'अक्कडबाज' शब्द विशेषत: मिशांना वापरतात. अर्धवर्तुळाकार या अर्थी आकडा हा शब्द वापरतात. (उदा. चिंचेचा आकडा) अशा मिशा असणारा माणूस. त्या सतत पिळणारा, गर्विष्ठ, उर्मट, दांडगाईखोर असणे अशा अनुभवामुळे अशा स्वभावाच्या, पण मिशा नसणाऱ्या व्यक्तीलाही अक्कडबाज म्हणतात. ही उपपत्ती जास्त योग्य वाटते.

'आखडू' हा शब्द माणुसघाणा, चिकट, अलिप्त, हट्टी अशा माणसाला वापरतात. हा आखुड, आखडणे यावरून आला असावा. कामचुकारपणा अथवा दान कमी देणे, याला हात आखडता घेणे म्हणतात.

आकेडियन संस्कृती फार खेड्यापाड्यापर्यंत पोचून तिथे वर्तनात्मक शब्द अग्राय टिकून आहेत. ही कल्पना मान्य करण्यापेक्षा वरील साध्या उपपत्ती योग्य मानणे, श्रेयस्कर होईल.

मी कोणी भाषा वा व्युत्पत्तिशास्त्रज्ञ नाही; पण सहज मनात आले, हे लिहिले यात डॉ. पवार यांचा अधिक्षेप करण्याचा उद्देश नाही.

आपला
शरद अभ्यंकर

'मयूर', ३९६, मधली आळी, वाई, जि. सातारा.










# ज्योत्स्ना देवधर यांचे कथाविश्व



आशा कर्दळे

प्रसिद्ध कथालेखिका श्रीमती ज्योत्स्ना देवधर यांनी जवळजवळ गेली तीन दशके कथालिखाण केले. १९६९ साली त्यांचा पहिला कथासंग्रह 'गाऱ्या गाऱ्या भिंगोऱ्या' प्रसिद्ध झाला. अगदी अलीकडचा कथासंग्रह 'याचि जन्मी' गेल्या वर्षी, म्हणजे १९९९ मध्ये प्रसिद्ध झाला. या तीस वर्षांच्या काळात ज्योत्स्नाबाईंनी विपुल कथालेखन केले. एकंदर एकोणीस कथासंग्रहांमधून सुमारे दोनशे ते सव्वादोनशे कथा समाविष्ट आहेत. त्यांचा आढावा घेणे उद्‌बोधक ठरेल.

साधारणत: १९६० ते १९८५ या कालखंडात आपल्याला असे आढळून येते, की मासिकांची संख्या पुष्कळच वाढली. त्या मासिकांमधून सातत्याने कथालिखाण करणाऱ्या अनेक कथालेखिका ज्योत्स्नाबाईंना समकालीन होत्या. शैलजा राजे, योगिनी जोगळेकर, गिरिजा कीर, शकुंतला गोगटे इत्यादी. या काळाचा विचार करता असे म्हणता येईल की, स्त्रीमुक्तीच्या विचारांचे वारे वाहायला नुकताच प्रारंभ झाला होता. कौटुंबिक जीवनात विविध प्रकारचे ताण-तणाव निर्माण होत होते. नवविचारांचे वारे घराघरातून भिरभिरायला लागले होते. स्त्रीच्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाची आस फारच जोरकसपणे समाजाच्या सर्व थरांत जाणवू लागली होती. त्याचे भलेबुरे परिणाम अर्थातच स्त्रीवर जास्त होत होते. वाङ्मयीन दृष्टीने पाहिले तर नवकथेची लाट ओसरली होती, पण नव्या जाणिवा, आशय आणि अन्वय घेऊन स्त्रियांचे कथालेखन भराला आले होते. या टप्प्यावर उभ्या असलेल्या स्त्रियांपुढचे प्रश्न अनेकांगी होते. नोकरी, घर, मुले, पती, वरिष्ठ, इतर पुरुष, आसपासच्या इतर स्त्रिया, नातलग आणि या सगळ्यांच्या केंद्रस्थानी असलेली स्त्री. विकासाच्या संधी होत्या, पण त्या संधींबरोबर येणारे संघर्षही होते. शारीर जाणिवा, मनोवस्था सगळेच बदलत होते, पण तरीही मुळाशी सनातन दु:ख आणि स्त्रीत्व होतेच. या सगळ्याला सामोऱ्या जाणाऱ्या कथा ज्यांनी लिहिल्या, त्यात ज्योत्स्नाबाईंचे नाव आवर्जून घ्यावे लागेल.

हे कथालिखाण तीस वर्षांचा मोठा कालपट व्यापणारे असल्याने प्रारंभीचे दोन कथासंग्रह, 'गाऱ्या गाऱ्या भिंगोऱ्या' आणि 'गजगे' (१९७०) यातली ठळक वैशिष्ट्ये लक्षात घ्यायला हवीत. एक गोष्ट स्पष्ट दिसते की, काहीतरी वेगळे करण्याचा, लिहिण्याचा अट्टाहास मुळात त्यांनी केलेलाच नाही. पुरुषांसारखे लिहिण्याचा प्रयत्न केला नाही. उलट मराठी भाषेचे बायकी वळण कथांमधून टिकवून ठेवले, जोपासले. बायकी भाषा, बायकी विषय हाताळताना त्यांना कधीच कमीपणा वाटला नाही. त्याकडे हेटाळणीच्या दृष्टीने बघणाऱ्यांची गंमत वाटली. स्त्रीने जाचक बंधनात काचू नये, असे त्यांना निश्चित वाटत होते, पण स्त्रीमुक्तीची टोकाची भूमिका त्यांना मान्य नव्हती. आपल्या कथांमधून त्या विरोधी सूरही कधी कधी लावताना दिसतात.



अनुक्रमणिका

जुन्या काळातल्या स्त्रियांचा त्याग, त्यांची सोशीकता, त्यांचे जीवन त्यांनी रंगवले. तेही एक वास्तव होते. त्या स्त्रिया तसे जीवन जगल्या होत्या. त्यामुळे हे वास्तव कथांमधून का येऊ नये?

या दोन्ही कथासंग्रहांमधून जुन्या काळच्या श्रद्धावान स्त्रिया भेटतात. त्यांच्या समर्पणशीलतेची ताकद कळते. 'कमळाक्का' या त्यांच्या प्रारंभीच्या कथेत ज्योत्स्नाबाईंची चित्रदर्शी, अर्थवाही, कहाणीसारखी भाषा दिसून येते. जुन्या स्त्रिया असेच सूत्रमय भाषेत बोलायच्या. पण त्यातून फार मोठा अर्थ ध्वनित व्हायचा. या प्रारंभीच्या कथासंग्रहांपासूनच त्यांची समर्थ शैली प्रस्थापित झालेली दिसते. अस्सल मराठी बाज जपणारी. हिंदी साहित्याचा गाढा अभ्यास असणाऱ्या ज्योत्स्नाबाईंनी हिंदीमधून नजाकत, सौष्ठव आणि लहेजा हे शैलीचे तीन गुण उचलले आणि आपली शैली या गुणांवर पोसली. त्यांची पहिलीच कथा स्त्रीच्या दु:खाचा समर्थ उद्गार ठरली. कुणासाठी जगावे आणि का जगावे असा प्रश्न पडलेली, शहरातून खेड्यात आलेली कमळाक्का. नवरा, मुली, कुणीच तिला समजून घेऊ शकत नाही. अखेर ती आत्महत्या करते.

'गजगे' या कथासंग्रहातील पहिली कथा 'निवारा' ही वरीच दीर्घ आहे. 'चांगल्या माणसाला चांगलं भविष्य असतंच असं नाही' अशी जीवनदर्शी वाक्ये वरचेवर येतात. पतीला दुसऱ्या स्त्रीपासून झालेले मूल पत्नीने स्वीकारणे हा विषय तसा नवा नाही. पण यात जयश्रीच्या नवऱ्यावर खोटा आळ

**ज्योत्स्ना देवघर यांचे कथासंग्रह**

- गाऱ्या गाऱ्या भिंगोऱ्या - १९६९
- गजगे - १९७०
- सात घरांचा सीमारेषा -
- उद्ध्वस्त - १९७५
- मिसफिट - १९७८
- समास - १९९०
- दीर्घा - १९८७
- मधली भिंत - १९८७
- वोच - १९८४
- विंझणवारा - १९९२
- पैलतीर - १९९३
- काळजी - १९९४
- याचि जन्मी - १९९९
- निवडक ज्योत्स्ना देवधर - १९८१
- आकाशी - १९७५
- झरोका - १९७९
- सायली - १९७९
- फिलर - १९८३
- धुम्मस - १९८३

घालून ही त्याचीच मुलगी म्हणून जयश्रीच्या गळ्यात एका स्त्रीने बांधणे, जयश्रीने ती नवऱ्याची मानून स्वीकारणे आणि काही काळ दूर गेलेला नवरा परत आल्यावर 'मी असे काहीही केले नाही' म्हणणे यात खरे नाट्य आहे.

'गाऱ्या गाऱ्या भिंगोऱ्या' या पहिल्याच कथासंग्रहातली भाषा उपमा, प्रतिमांनी फुललेली, (पुढे ज्योत्स्नाबाईंच्या शैलीचा तो विशेषच झाला) आणि अर्थवाही आहे. अल्पाक्षरी आणि सूत्रमय. 'टापटिपीच्या

वातावरणावर तवंग आल्यासारखे पेशंट्स', 'निळ्याशार पाण्यावर शेवाळं यावं तसे हे रोगी'. शब्दांना एक प्रकारचा नाद आहे.

यश म्हणजे पुत्र नव्हे
कीर्ती म्हणजे कन्या नव्हे
भक्ती म्हणजे मातृत्व नव्हे

हे सगळं नाही म्हणजे बाईनं करावं तरी काय? सुख कशाशी खावं? यश कसं प्यावं? या कथेची नायिका एक यशस्वी डॉक्टरीण, पण व्यक्तिगत आयुष्यात दु:खी-कष्टी. एकाने केलेला अन्याय दुसऱ्याने निस्तरला तरच समाजात तोल राहतो, असे मार्मिक तत्त्वज्ञान सांगणाऱ्या या संग्रहातल्या कथा बाईचे दु:ख गडद करतात.

माणसाच्या सुखाचे स्वरूप सारखेच असते, पण दु;ख मात्र व्यक्ती व्यक्तीगणिक भिन्न असते म्हणतात. सगळ्या कथासंग्रहांमधून स्त्रीच्या दु:खाच्या बारीकसारीक वेगवेगळ्या छटा व्यक्त झाल्या आहेत. ज्योत्स्नाबाईंच्या बहुतेक नायिका स्वत:ला विसरून जगण्याचा प्रयत्न करतात, पण एखादा क्षण असा येतो की, 'मी माझी सावली माझ्या शरीरापासून ओरबाडून खोल खोल खड्ड्यात गाडून टाकली होती. ती सावली एकदम सगळ्या ओळखी-पाळखींसह, खाणा-खुणांसह माझ्यासमोर उभी ठाकली.' अशी अनुभूती येते. 'मिसफिट' या कथासंग्रहातली (१९७८) 'मिसफिट' ही कथा शीर्षकातूनच आशय सूचित करते. नायिकेचा नवरा घरात असला की विचित्र ताण निर्माण होतो. मुलांविषयी, पत्नीविषयी, घराविषयी त्याला आपलेपणा नाही. मुलीला आईची व्यथा कळते. 'बाबांबरोबर तू आजवर कसा संसार केलास कोण जाणे. नको असलेल्या माणसाबरोबर बायको म्हणून राहायचं, वावरायचं, त्याचे बायकोपण स्वीकारायचं...' मायलेकीचे हे संबंध, हे बोलणे धाडसाचेच म्हणायला हवे. पण आपण नवऱ्यावर अन्याय केला आहे, या जाणिवेने अपराधी वाटणारी ही नायिका - पत्नी आहे. असे विसंवादी विवाह ज्योत्स्नाबाईंच्या अनेक कथांचे विषय झाले आहेत.

याच संग्रहातली 'कहाणी' ही आशय, अभिव्यक्ती दोन्ही दृष्टींनी वेगळी आहे. याही कथेत माय-लेकीचे उत्कट नाते आहे. पण पुत्रविरह हा दोघींच्याही दु:खाचा समान मूलकंद आहे. संसारात सुख नाही तरी व्रत-वैकल्ये, उपासतापास श्रद्धेने करणारी आई. ती देवी-देवतांच्या कहाण्या वाचते. पण तिची मेलेली मुले नागकन्या, देवकन्या कुणीही परत आणून देत नाहीत. कहाणीत मात्र देतात. आई आणि आक्का या दोघी मायलेकींची मुले अपघाती मृत्यूने मेलेली. 'दोघींच्या मणक्यांच्या खुंटाळ्यावर कितीतरी दु:खांची लक्तरं लोंबत होती.' कहाणी आणि वास्तव अशा दोन पातळ्यांवर ही कथा समर्थपणे वावरते.

स्त्रीचे स्त्रीत्व तिच्या शरीरात तर आहेच. कितीही नाकारले तरी. या शरीराकडे बघण्याचा दृष्टिकोन प्रत्येकीचा भिन्न असू शकतो. 'पैलतीर' (१९९३) या संग्रहातल्या त्याच नावाच्या कथेत वृद्धाश्रमात राहणाऱ्या दोन स्त्रिया भेटतात. त्या अर्थातच वृद्ध आहेत. एक गतकाळची प्रसिद्ध नर्तकी आणि दुसरी क्रांतिकारकाची पत्नी. दोघींची जीवने वेगळी, दु:खे वेगळी.

क्रांतिकारकाच्या पत्नीने मन, शरीर मारले. आता लोकांनी हार-तुरे, शाली दिल्या; पण त्याचे तिला अप्रूप वाटत नाही. याउलट नर्तकीने ज्या वयात ते मिळवायला पाहिजे, ते मिळवले. शरीराचा उत्सव ती जगली. पण तेही तिला अमंगळ वाटते. पहिली शरीर भोगून आणि दुसरी न भोगूनही दु:खीच आहे. क्रांतिकारकाच्या पत्नीला जाणीव आहे की, त्याचे हे जन्मशताब्दीचे वर्ष संपले की सगळे संपेल. त्याचा पुतळा अडगळीत जाईल. समाजाच्या प्रखर वास्तवाच्या पार्श्वभूमीवर त्यागवादी आणि भोगवादी अशा दोन्ही प्रवृत्तींचा पराजय अस्वस्थ करून जातो.

'काळजी' या कथासंग्रहातली (१९९७) 'देवभूमी' ही कथा ज्योत्स्नाबाईंच्या काही कथांचे प्रतिनिधित्व करणारी आहे. वडिलांच्या मृत्यूनंतर त्यांच्या लहानशा गावी आलेली आसावरी. ती भूमी, ते घर वडिलांच्या वास्तव्याने पवित्र झालेले. 'कढीलिंबाची पानं नातं जोडतात' असा अनुभव घेणारे सात्त्विक, सज्जन वडील. याउलट नवरा, मुलगा, मुलगी मात्र अनीतिमान. त्या सगळ्यांना सोडून ही नायिका खेड्यातल्या, मळ्यातल्या घरी रहायचे ठरवते. तिघांपैकी कुणीही आपले भ्रष्ट पाय या घराला लावू नये, ही तिची इच्छा. घरातली माणसे मनासारखी नसतील तर त्यांना सोडण्याची धमक असलेल्या काही बंडखोर नायिका ज्योत्स्नाबाईंनी रंगवल्या आहेत. त्यांतली ही एक. प्रस्थापित सामाजिक - कौटुंबिक बंधनांना त्या नायिका नाकारतात. अशा स्त्रिया वास्तवात त्यांना कुठे कुठे भेटल्या असतीलही. कुटुंबव्यवस्थेत बदल करण्याच्या भानगडीत न पडता त्या सरळ घरच सोडतात.

**आशा प्रकाश कर्दळे**

एम्. ए. मराठी

बी. ए. ला मराठीत सुवर्णपदक

बी. ए./एम्. ए. दोन्ही वर्षी गुणवत्ता यादीत.

गेली २० वर्षे लिखाण. एकूण २० पुस्तके प्रसिद्ध. यात कथा, कादंबरी, चरित्र, अनुवाद यांचा समावेश.

काही उल्लेखनीय पुस्तके

शरीरयात्रा - कथासंग्रह

उपशाखा - कथासंग्रह

विदेश - कादंबरी

पर्ल बक - चरित्र

विदेशातील ज्येष्ठ आणि श्रेष्ठ - चरित्रपर व्यक्तिचित्रे

माय स्टोरी - अनुवाद

आय डेअर - अनुवाद

चेंजिंग - अनुवाद

पुरस्कार - शरीरयात्रा - श्री. ज. जोशी पुरस्कार

शकुंतला जोग पुरस्कार

राज्य पुरस्कार

कृष्णपक्ष - म. सा. प. चा नी. स. गोखले पुरस्कार

आय डेअर - राज्य पुरस्कार

विदेश -

१) म. सा. प.चा ह. ना. आपटे पुरस्कार

ना. सी. फडके पुरस्कार

शरदबाबू लेखिका पुरस्कार

घर सोडून राहणे त्यांना फारसे कठीण जात नाही. समाज त्यांच्यामागे असतोच असे नाही, पण त्या पुरेशा कणखर असतात.

'सात घरांच्या सीमारेषा' या संग्रहातली याच नावाची कथा अतिशय सूक्ष्म आणि तरल आहे. स्त्रीची शरीरविषयक जाणीव वेगळ्या पातळीवर अभिव्यक्त झाली आहे. लग्न ठरलेले ती आणि तो. त्याला तिला लग्नाआधी विवस्त्र बघायचे आहे. त्याच्या मित्राच्या खोलीवर दोघे जातात. ती त्याच्या इच्छेला मान देते. तो मित्राचा शर्ट तिच्या अंगावर फेकतो. तिला भास होतो, मित्र बघतो आहे. तिचा भावी पतीही तिला नग्न पाहून पुढे काहीच करत नाही. तिला ती आपल्या सुंदर शरीराची मानखंडना वाटते. तिच्या फारच नाजूक भावनांना तडा जातो. 'सुहागरात'चे तिचे स्वप्नही विरून जाते. लग्नमंडपात वावरताना तिला आपण केरकचरा असल्यासारखे वाटते.

स्त्रियांच्या शरीरसंवेदना ज्योत्स्नाबाईंच्या कथांमध्ये विविध रूपांत प्रकट होतात. शरीरसुखाचे पावित्र्य, मोल, सौंदर्य यांना महत्त्व देणाऱ्या त्यांच्या काही नायिका आहेत, तर मातृत्व ही आनंदाची घटना न मानता मुलाच्या रूपाने आपण एखादा दुष्ट अंकुर पोसत आहोत, अशी दाहक जाणीवही त्या काही स्त्रियांच्या संदर्भात प्रकट करतात. 'आकाशी', 'घालमेल' या कथांचा या संदर्भात उल्लेख करता येईल.

आई आणि वडील या दोघांपैकी कुणाचे तरी विवाहबाह्य संबंध असणे आणि त्यात मुलांचे भरडून निघणे हा विषयही बऱ्याच कथांमधून हाताळलेला दिसतो. मुलांचे भावविश्व उन्मळून पडते. त्या दृष्टीने 'कमल' ही कथा पाहण्यासारखी आहे. कमलला तिचे बाबाच आवडतात. आईच्या मित्राचा राग येतो. आई त्याची कामे करते, कमललाही करायला लावते. कमलला वाटते, आईचे आपल्याकडे लक्षच नाही. ती वयात येणारी मुलगी. पण घालायला नीट कपडे नाहीत. तिला वाटते, आवळ्यातले बी काढून फेकून देतो, तशा या छातीतल्या गाठी काढून फेकून द्याव्यात. परकर-पोलक्याच्या आतून आपण नागड्याच असतो. 'डिवोर्स' या कथेतही हाच विषय आहे. एकमेकांशी पटत नसलेल्या आई-बापांची मुले. ती कोवळ्या वयात कसनुशी होऊन जातात. किंवा पार्ट्या, मद्यपान, मौजमजा यातच मशगुल असणाऱ्या जोडप्याची मुले रात्री-अपरात्री एकाकी असतात. अर्थिक सुस्थिती, सुबत्ता नसते तेव्हा सुख असते, श्रीमंतीबरोबर वाईट गोष्टी येतात हाही उपसिद्धान्त, काही कथा अधोरेखित करतात. काही वेळा 'मेकअप'सारख्या कथेत आपल्याच प्रेमात दंग असणारे आणि वयात येणाऱ्या मुलीच्या मनाचा विचारही न करणारे जोडपे येते.

'उद्ध्वस्त' (१९७५) या कथासंग्रहातली 'सेल' ही कथा ज्योत्स्नाबाईंच्या अनेक लेखनविशेषांचे प्रतिनिधित्व करते. या कथेची नायिका एक कॉलगर्ल. पण मुळात साधी-सरळ बाळबोध. तथाकथित आधुनिक जगाच्या झगमगाटाने तिचा पालापाचोळा करून टाकलेला. स्त्रीची एक सनातन ओढ असते. पितळी डबे घासणे, सडा घालणे, सारवणे, घर छान ठेवणे, पुरणावरणाचा स्वयंपाक करणे. हेही स्त्रीरूप ज्योत्स्नाबाईंना भावले. त्यांच्या काही नायिकांना

मातृत्वाची घृणा असली तरी काहींना मातृत्वाची दुर्दम्य-आदिम ओढही आहे. या कथेतली माधवी आपल्या वैभवशाली बंगल्यात सुखाला पारखी झालेली आहे. माळिणीच्या दुधाने टचटचलेल्या स्तनांना ती स्पर्श करून बघते. हे सुख आपल्याला मिळणार नाही म्हणून तिला रडू येते. बालपणापासून आयुष्य कसे बदलत गेले ! श्रीमंती आली, पण आनंद लुप्त झाला. रडणेच फक्त निर्मळ राहिले होते. त्याला कुणाचे हात लागले नव्हते. तिचे हसू पैसे मोजून पिणाऱ्यांना तिच्या अश्रूंचे मोल माहीत नव्हते. त्यांची धग माहीत नव्हती. कारण ते कुणासमोर कधी सांडले नव्हते. तर या कथेतून दिसणारी, थोड्याफार फरकाने ज्योत्स्नाबाईंच्या इतर कथांचीही असलेली लेखनवैशिष्ट्ये कोणती? त्यांती कथा ही दृश्यचित्रांची मालिका असते. कथेत बराच मोठा कालपट काही वेळा असतो. व्यक्तिरेखांचे भूतकाळाचे संदर्भ मधून मधून येतात. त्यांची जीवनविषयक काही प्रणाली असते आणि त्या ती जोपासण्याचा प्रयत्न करतात. कथेच्या चौकटीत ती व्यक्ती अनुभवांच्या मालिकेतून फिरते. अनेकदा ज्योत्स्ना देवधर सगळेच तपशील सांगत नाहीत. बरेचसे सुचवतात आणि वाचकांच्या कल्पनाशक्तीवर सोडून देतात. या रिकाम्या जागा भरताना वाचक कथेत गुंतून जातो. पात्रे एका तीव्र भावनेतून दुसऱ्या भावनेत सहज जातात. रडतारडता खुदकन हसतात. अतीव दुःखाच्या क्षणी त्यांना काहीतरी आठवते. काही तपशील अचानक मध्येच येऊन वाचकांना आश्चर्याचे धक्के देतात. पण कथेची नाट्यात्मकता वाढवतात.

मानसिक संतुलन गमावलेल्या जिवलगांना सांभाळण्याचे भागध्येय काही स्त्रियांच्या वाट्याला येते. उदा. 'तळघर' ही कथा. नवरा आणि मुलगा अशा दोन उद्ध्वस्त जीवांना सांभाळणारी प्रतिभा सोशीकपणाचा नमुना आहे. या कथेच्या निमित्तानेही थोडे लिहायला हवे. ज्योत्स्नाबाई शृंगार, कामभावनांचे चित्रण करतात. पण सूचकतेने. 'अप्पांच्या पिळदार दंडावर तिच्या ओठांचे निळे ठसे पाहून तो सुखानुभव शरीराच्या रोमारोमात उमलायचा. स्वर्गसुखाची लय लागल्याचे ठेके होते ते ठसे. बायको जवळ असल्यासारखे अप्पा ते ठसे आंजारत गोंजारत. रात्री सुखाच्या गुहेत शिरलेली ती दोघं तिथंच रेंगाळत.''

ज्योत्स्नाबाईंच्या नायिकांवर अनेक संकटे कोसळतात, पण त्या सोसतात आणि जोडीला देवधर्मही करतात. दुःख अपार असते, पण रडून उपयोग काय? संसारात दुःख पचवणाऱ्या स्त्रीची मनोभूमिका कशी असते? तर 'तू स्त्री आहेस. रडायचं म्हटलं तर साता समुद्रात आणखी एका समुद्राची भर पडेल. स्त्रीनं संसाराचं हालाहल पचवायचं नाही तर कुणी?'

ज्योत्स्नाबाईंच्या बहुतेक नायिका सुंदर, गुणी, बुद्धिमान तर असतातच, शिवाय घरच्यांनी लाथाडले म्हणून लाचार न होता स्वतःच्या पायावर उभ्या राहणाऱ्या खंबीर असतात. यात वृद्ध स्त्रियाही येतात. 'विंझणवारा' (१९९२) आणि 'याचि जन्मी' (१९९९) या दोन कथासंग्रहांमधल्या कथांचा निर्देश या दृष्टीने करायला हवा. 'बेघर' या कथेचे स्वातंत्र्य हे मूल्य असते, त्याचा कोण कसा अर्थ लावतो, उपयोग करून घेतो, ते महत्त्वाचे, हे तत्त्व आहे. सून वेगळी झाली ती स्वातंत्र्यासाठी. सासूने आपले एकलेपण स्वातंत्र्यात बदलवून टाकले. मुलगा

आणि सून न सांगता वेगळे झाल्यावर त्याचे दु:ख करून न घेता जीवन उपभोगणारी आई. बायकोला घर हवे - ते तिचे घर. तिला मिळाले. आईचे घर आईने उभे केले. मधल्यामध्ये आपणच बेघर झालो, ही जाणीव श्रीकांतला होते. 'मालन' ही कथाही अशीच. नवरा, मुली सगळी विरुद्ध गेल्यावर सगळ्यांना टाकून मालन परदेशी निघून जाते. एका श्रीमंत जोडप्यावरोबर त्यांच्या घरी काम करायला. या नायिका आयुष्यातले महत्त्वाचे निर्णय फार तडकाफडकी घेतात. सगळी परिस्थितीही अनुकूल-जुळून येते. सहजतेने त्या घर सोडतात. स्त्रीने अन्याय सहन करू नये, हे सुचवून तिला बळ देणाऱ्या या कथा आहेत. त्यांच्या जीवनात गुंता होतो, पण तो सहज सुटतो. 'सुखाचा शोध' या कथेतली अंवूताई मुलांशी जशासतसे वागावे या मताची. उतार वयात ती सगळी हौसमौज करून घेते. 'या आजच्या जगात जो दगड वनून राहील, तोच सज्जड राहील.' असे तिला वाटते. घरच्यांना अद्दल घडवणाऱ्या या स्त्रिया आहेत. 'पाच दिवस' या कथेची नायिका अशीच जशास तसे वागणारी. आपल्याला मुले ट्रिपला, नाटकाला नेत नाहीत म्हणून ती चार दिवस मजा करायला निघून जाते. 'आपण वारसाहक्कानं धन-दौलत, अधिकार घेतो ना, तसंच कर्ज, वाईटपणा, भांडण पण घ्यावं लागतं.' असे तिचे मत. वहुतेक सासवा जळत-पिचत न जगता सुनेशी वंडखोरपणा, ताठरपणा करून स्वत:च्या मनासारखे करून घेणाऱ्या आहेत. उदा. 'जुगार' ही कथा. ज्योत्स्नावाईंची सहानुभूती जुन्या-नव्या पिढीच्या संघर्षात अर्थातच जुन्या पिढीकडे आहे.

जुन्यानव्या पिढीचा संघर्ष 'समास' या कथासंग्रहातल्या (१९२०) 'समास' या कथेत वेगळ्या तऱ्हेने व्यक्त झाला आहे. संसारासाठी खपायचे, कष्टायचे, झिजायचे, स्वत:ची ओळख विसरायची ही जुन्या पिढीची आचारपद्धती. बाईने आपल्या घरासाठी, माणसांसाठी सर्व मुळी करायचेच असते. त्यात काय विशेष? नवी पिढी मात्र अस्मिता, व्यक्तिमत्त्वविकास, स्वातंत्र्य, माणूस म्हणून जगण्याचा हक्क या कल्पनांनी भारलेली. मुलगी आईला (शुभा) म्हणते, 'स्वत:ला संपवून, त्याग-बिग करून, सोशीकपणा दाखवून, स्वत:चा विकास मारून तू जगलीस. सगळ्यात मला राग येतो की, असल्या गोष्टी करण्यात तुला मोठेपणा वाटतो.' या आईची एकसष्टी घरातले सगळे उत्साहाने साजरी करतात. छान समारंभ, आईचे कौतुक झाल्यावर कल्पना निघते, की सगळ्यांनी आपापल्या मनातली शल्ये अगदी मोकळेपणाने सांगायची. ते कुणी मनाला लावून घ्यायचे नाही. त्यावेळी आईच्याच दोषांचा पाढा वाचला जातो. नवरा, मुलगा, मुलगी आईचे कसे चुकले तेच सांगतात आणि आईला हादरा बसतो! घरासाठी एवढा त्याग केला तो व्यर्थच गेला असे तिला वाटते. शेवटी ती स्वत:लाच सांगते - 'शुभा, तू... फक्त-तू आहेस. एक स्वतंत्र अस्तित्व. एक स्वतंत्र सत्ता. एक माणूस. आजवर या लोकांच्या नात्यांच्या संदर्भात जगत आलीस. तुझं तुझ्याशी काही नातं आहे की नाही?'

सगळीच मुले वाईटच असतात, असे नाही. आईपणाला भूषण ठरणारी काही मुले असतात. माय-लेक संबंधाचा असाही एक रंग. 'वोच' (१९८४) या कथासंग्रहातल्या 'बोच' या कथेतला सर्वांत लहान मुलगा अच्युत. त्याच्या वेळी दिवस गेले तर तिने पाडायचा प्रयत्न

केला होता. पण मोठा झाल्यावर तोच तिची सर्व हौस पुरवतो. तिला तीर्थयात्रेला घेऊन जातो. तो नसता तर आयुष्यात काहीच घडले नसते.

वेगळ्या आशय-विषयाच्या म्हणून लक्षात राहणाऱ्या काही कथांपैकी 'नाही' ही एक कथा आहे. तुरुंगात दुसऱ्या स्त्रीच्या वासनेची बळी ठरलेली शामली. आपल्याशी लग्न करण्याची अजूनही इच्छा ठेवणाऱ्या तरुणाच्या योग्यतेचे आपण राहिलो नाही, ही अपराधी जाणीव तिचे मन कुरतडते. दुसऱ्या स्त्रीने चावा घेतलेला शामलीचा स्तन कापून टाकावा लागतो. शरीरसुख हवे वाटल्याचा केवढा भयंकर परिणाम ! ती काठी घालून स्वतः योनी फाडून टाकते. आपले स्त्रीत्व उच्छेदून टाकते.

'मधली भिंत' (१९८७) हा अनेक अर्थांनी लक्षणीय असा कथासंग्रह. यात ज्योत्स्नाबाईंनी स्त्रीच्या मनाचा शोध तिच्या करुणेच्या, वेदना-संवेदनांच्या संदर्भात, कुटुंबसंस्थेच्या संदर्भात घेतला आहे. यातल्या नायिका सत्त्वशील आहेत. त्यांना भडक रंग नाही. आक्रस्ताळेपणा, मोडतोड करणारी ही स्त्री नाही. तिच्या स्वातंत्र्याकांक्षेला संयमाची साथ आहे. तिचे यशापयश, धडपड, मनाचे गहिरे रंग सर्व कथांमधून व्यक्त होतात. 'मधली भिंत' या कथेत स्त्रीची घुसमट सर्व बारकाव्यांनिशी उभी राहिली आहे. या कथेची नायिका अंजली चांगली सुशिक्षित आहे. पण ती काहीही बंडखोरी करीत नाही. परिस्थितीशरण आहे. तिला वाटतं, आपण भिंतीसारख्या आहोत. 'निर्जीव भिंत सोयीची असते, नाही? दगडविटांची भिंत. आपल्याला हवा तो रंग फासावा. त्या मोबदल्यात तिनं घराला आडोसा द्यावा, आधार द्यावा, संरक्षण करावं, अंगावर ठोकले गेलेले खिळे मुकाट सहन करावेत. लटकवले जातील ते फोटो, चित्रं मिरवावीत. भिंतीला कान असतात ही म्हण आहे. पण भिंतीला तोंड असतं, हे म्हणीलाही मान्य नाही.' अशा दुरावलेल्या मनांच्या पती-पत्नीचे संबंध कसे असतात? शरीरसंबंध किती अपमानकारक असतात ! आणि तोच तर या नात्याचा मूलाधार. निदान तसे मानले गेले आहे. 'हे असंच होतं नेहेमी. या ना त्या विचारानं आपण त्याच्या जवळ जातो. तो जिंकतो. मग उभी रात्र आत्मग्लानी, वेदना आणि पराजयाच्या भावनेनं आपण तळमळत राहतो.''

पुरुषपण आणि स्त्रीपण यांचा अर्थ लावण्याचा प्रयत्न 'परका' या दीर्घकथेत केला आहे. 'दीर्घा' या कथासंग्रहात (१९८७) प्रतिशोध आणि 'परका' या दोन दीर्घकथा आहेत. पुरुषाचे पुरुष असणे आणि स्त्रीचे स्त्री असणे, या बाबत उभयतांच्या मनांत नेहेमी झगडा चालू असतो, गोंधळ असतो. पुरुषत्व आणि स्त्रीत्व ही कल्पना काहीशी संदर्भ सोडून या कथेत खेळवली आहे. त्यामुळे ती फक्त निवेदनाच्या पातळीवर, उपरी वाटते. तथापि, कथाविषय असा - सौदामिनी मकरंदची पहिली पत्नी. तिला तीन मुली होतात. मुलाची ओढ असते ती पुरुषाच्या मनीषेतून. ती म्हणते, 'ही पोटात असताना मनीचा पुरुष रक्ताच्या थेंबाथेंबानं वाढवला होता. अन्नाचा प्रत्येक घास, त्याचा अंश गर्भाला पुरुषत्व देईल अशी मनोकामना करत घेतला होता. सुदृढ मुलाचं रुपडं पाहात होते, पण झाली मुलगी. मात्र पुरुषाची मस्ती, बेपर्वाई, स्वार्थी वृत्ती तिनं उचलली.' मकरंदची दुसरी पत्नी गिरिजा हिलाही पुरुष आणि स्त्री यांच्या अदलाबदलीचे

आकर्षण. मूळ धर्म जाणून न घेता ती म्हणते, 'हे सर्व पुरुषाला शोभेल असं मी केलं असतं. तुम्ही बाई झाला असतात तर कोणाही पुरुषाला सुखी केलं असतं.' गिरिजाला मूल हवे आहे. म्हणून ती दुसऱ्या पुरुषाचे वीर्य घेऊन गर्भ धारण करते. पण त्यामुळे तिन्ही मुली दुरावतात आणि येणारे मूल परके ठरते. स्त्रीत्व आणि पुरुषत्व यांचा शोध आणखी खोलात जाऊन घेता आला असता, असे वाटते.

इथवर ज्योत्स्नाबाईंच्या काही निवडक कथांचा परिचयही जाता जाता करून दिला. साकल्याने या कथांचे विशेष सांगता येतील. नवविचारांचे वारे वाहू लागल्यानंतरच्या काळात लिहिल्या गेलेल्या या कथा प्रामुख्याने कुटुंबकथा आहेत. त्यातही कुटुंबसंस्थेचे विघटन दर्शविणाऱ्या या कथा आहेत. या विघटनाची कारणे अनेक आहेत. व्यक्ती, त्यांचे स्वभाव, परिस्थिती वगैरे. बहुतेक कथा स्त्रीप्रधान आहेत. पुरुषपात्रे आनुषंगिक आहेत. दु:ख हे कथांचे केंद्र आहे. बहुधा हे दु:ख स्त्रीच्या वाट्याला येते. या दु:खाचे कारण म्हणजे कुटुंबातल्या व्यक्तींचा परस्परांबद्दल असलेला गैरसमज, दुरावलेले संबंध किंवा कामवासनेतील अतृप्ती. ज्योत्स्नाबाईंच्या कथांचा परामर्श स्त्रीला मध्यवर्ती ठेवूनच घ्यायला हवा.

बहुतेक कथांमधली जोडपी विजोड आहेत. म्हणजे पत्नी रूपवान, गुणी व पती दुष्ट, तिला समजून न घेणारा, कलागुण नसलेला. न आवडणाऱ्या माणसाबरोबर ती संसार करत राहते. अशा विसंवादी विवाहामुळे स्त्रीच्या वाट्याला दु:ख येते. अशा विवाहाची परिणती काय? तीन शक्यता आहेत. एकतर स्त्री मनाजोगता जोडीदार न मिळाल्याने जन्मभर कुढत राहते, किंवा अगदी असह्य झाल्यावर घर सोडून निघून जाते किंवा शरीरतृप्ती न झाल्याने शारीरिक आणि मानसिकही गरज म्हणून तिला दुसऱ्या पुरुषाची ओढ वाटते. स्त्रीमुक्तीच्या संदर्भात या कथा तपासल्या तर असे दिसते, की ज्योत्स्नाबाई कुटुंबावर होणाऱ्या परिणामांच्या सगळ्या शक्यता पडताळून पाहतात. त्यांची एकच एक अशी भूमिका नाही. दरवेळी त्यांची होणारी प्रतिक्रिया वेगवेगळी आहे. असेही होऊ शकते आणि तसेही. म्हणून त्यांच्या काही नायिका कणखरपणे वागतात, तर काही दुर्बलतेने. बंडखोरी करणारी नायिका एखाद्या कथेत रंगवतात. स्त्रीवादाचा विचार पूर्णपणे पचनी न पडलेल्या या पिढीच्या प्रतिक्रिया अशा संमिश्रच असणे संभवनीय आहे. कारण त्या वेळी त्यातले तरतम अद्याप कळायचे होते, स्पष्ट व्हायचे होते.

आणखी एक गोष्ट सांगावीशी वाटते, की 'गाऱ्या गाऱ्या भिंगोऱ्या' (१९६९) पासून तर 'याचि जन्मी' (१९९९) या तीस वर्षांच्या काळातल्या सुमारे वीस कथासंग्रहांमधून विकासाचा असा काही निश्चित आलेख काढता येणार नाही. ढोबळ अशा काही पाऊलखुणा दाखवता येणार नाहीत. लेखकांच्या बाबतीत तसा अट्टाहास करणे कितपत उचित आहे? काही वेळा तर लेखकाची पहिलीच साहित्यकृती सर्व उत्कृष्ट गुण घेऊन अवतरते आणि पुढे चढ-उतार चालू असतात. त्यामुळे पहिले पुस्तक कच्चे, पुढची पुस्तके परिपक्व असे म्हणता येईलच असे नाही. 'गाऱ्या गाऱ्या भिंगोऱ्या' पासून 'याचि जन्मी' पर्यंत शैली, आशय, विषय यात काही धक्कादायक बदल दिसत नाहीत. एक प्रकारचे सातत्य आहे. पहिल्या कथासंग्रहातल्या



अनुक्रमणिका

'बोगदा' किंवा 'वृद्धाश्रम' या कथेत आणि शेवटच्या कथासंग्रहातल्या 'कुंपण' या कथेत एकूण घाट, द्रव्य या दृष्टीने फारसा फरक नाही. एक विशिष्ट पातळी राखली गेली आहे.

कुटुंब या केंद्राभोवती फिरणाऱ्या कथांमध्ये काही वेगळ्या कारणांमुळेही कुटुंबाचे विघटन झालेले दाखवले आहे. उदाहरणार्थ, 'जिद्दी' मधील सारंगचा संसार बायकोच्या संशयी स्वभावामुळे उद्ध्वस्त होतो. 'गायीचे डोळे' या कथेतील सासूला सून आणि मुलगा यांचा शरीरसंबंध चोरून बघायची विकृत लालसा असते. त्यामुळे त्यांच्या संसारात दु:खाचा शिरकाव होतो.

ज्योत्स्नाबाईंही आपल्या कथांमधून स्त्री-पुरुष शरीरसंबंध विविध दृष्टींनी तपासला आहे हे त्यांच्या कथांचे बलस्थान म्हणायला हवे. शरीरसंबंध ही एक सुंदर जाणीव आहे. तिची भूक झाली की, पावित्र्य कमी होते. तिची बखबख झाली म्हणजे तर पावित्र्य नष्टच होते. ही बखबख माणसाचा जीव घेते. हौस आणि गरज, आवड आणि सक्ती, उपासमार आणि अतिरेक - कितीतरी पातळ्या असतात या शरीरसुखाला. यात मनाचा विचार का केला जात नाही? प्रत्यक्ष व्यवहारात शरीरसुखाचे नाजूक सौंदर्य बहुधा धसमुसळेपणाने कुस्करले जाते. किंवा दुबळेपणाने काजळते. विसंवादी विवाहातून करावा लागणारा रोजचा शरीरसंग - त्याला तर चीड, घृणा, किळस अशा अनेक भावनांचे पदर असतात. ज्योत्स्नाबाईंच्या नायिकांना तो राजरोस बलात्कार वाटतो. वय झाले म्हणजे तर स्त्रीच्या इच्छा-वासना उत्तेजित नसतात. अशा वेळी संभोग तिला नकोसा वाटतो. पण नवऱ्याच्या दमल्या-भागल्या शरीराला आपल्या शरीराचा घास भरवावाच लागतो. 'नवरा-बायकोच्या संभोगाचा शेवट अश्रूंत होत असेल तर आपल्यात आणि बाजारबसवीत काय फरक राहिला?' असा प्रश्न त्यांच्या नायिकांना पडतो.

'आपल्या नवऱ्यानं आपल्या सर्वांगाचा घास घेतला. अंग उसवून टाकलं. पण नुसती दंगा, नुसती मस्ती. त्याला शृंगार कसं म्हणायचं? आपल्या कायेवर या माणसाचा ठसा कधी उमटलाच नाही.' असे 'कडेलोट' या कथेची नायिका म्हणते. या स्त्रियांचे देहभान नुसतेच तीव्र नाही, तर एकूणच स्त्रीवर्गाची व्यथा बोलून दाखवणारे आहे. या संबंधाचा अखेरचा परिणाम एकच. शेवटी उरणारा थकवा. दोघांच्याही मनात भरून राहिलेली अपराधीपणाची जाणीव आणि सावकाशपणे पती-पत्नी नात्यात शिरणारा खोटेपणा, कृत्रिमपणा/ बहुतेक नायका या मध्यमवर्गीय आणि सुखवस्तू कुटुंबातल्या. त्यामुळे ही घुसमट चार भिंतींआड दाबून ठेवायची. कौटुंबिक आणि सामाजिक चौकटीत राहून जमेल तसा व्यक्तित्व विकास करायचा.

ज्योत्स्नाबाईंनी उभे केलेले सुष्ट-दुष्ट माणसांचे विश्वही बहुधा कुचंबलेल्या माणसांचे आहे. ती माणसे निरनिराळ्या आघातांनी पिचलेली आहेत. स्त्रीजीवन तर दारुणच. बाईच्या जन्माबरोबरच तिला शपथ घातली जाते - 'सगळं सोसण्याच्या शर्थीवरच तुला जगण्याचा हक्क आहे.'

घराबाहेर पडलेल्या स्त्रीला पुरुषापेक्षा हजार पटींनी सोसावे लागते. शंभर वाटांनी तिची ससेहोलपट हेते. या देशातली स्त्री देवता असते. त्यागमूर्ती असते. ती न बोलता सगळे सहन करते. मात्र, ज्योत्स्नाबाईंनी दोन प्रकारच्या स्त्रिया रंगवल्या आहेत. कुटुंबासाठी खस्ता खाणाऱ्या,










त्याग करणाऱ्या आणि स्वत:चा स्वतंत्र मार्ग चोखाळणाऱ्या. कालची समर्पणशील स्त्री आणि आजची विकसनशील स्त्री अशा दोन्ही प्रकारच्या स्त्रिया दिसतात. तथापि ती स्त्री कौटुंबिक नातेसंबंध जाणीवपूर्वक बदलू बघताना दिसत नाही.

ज्योत्स्नाबाईंच्या शैलीविषयी लिहायला हवे. रेडिओवर काम केल्यामुळे त्याचा परिणाम शैलीवर झाला आहे. बोली आणि अल्पाक्षरी शैली. लहान लहान वाक्ये आणि छोटे संवाद. कहाणीसारखी भाषा. भाषाशैलीच्या बळावर इतर वाङ्मयीन अडचणी पार केल्या जातात. प्रतिमा, उपमा या स्त्रीच्या अनुभवविश्वाशी प्रामाणिक असणाऱ्या. निवेदनाला उजळण्याचे काम या प्रतिमा करतात. वाक्यार्थाचा अर्थ त्या एकदम वृद्धिंगत करतात. उदा. 'मधली वर्षं त्याचा तोच वाढला. माळावर पडलेल्या निवडुंगासारखा.' आणखी काही प्रतिमा -

१) मग ही अलीकडे अशी का वागते? कापडाला धस लागल्यासारखी?

२) रेशमी कपडा पाण्यात टाकल्यावर सुरकुतून जावा, तशी ती अंगभर झाली होती.

३) त्या उत्कट मधुर क्षणांचे तरंग तिच्या शरीरात हलव्याचा काटा घोळवत होते.

४) एकदा उकड चुकली की काही केल्या मोदक घडत नाही. किती चिरा, किती भेगा ! ना घाट, ना आकार, ना रूप.

५० पायऱ्यांवरून वंदा रुपया घरंगळत यावा, तशी एक कणीदार सुरेल तान दिवाणखान्यात येऊन हवेत तरंगत राहिली.

६) शेकडो छिद्रं असलेलं ते धिरडं तव्यावर उलटताना तिला वाटलं, आपलं काळीज असंच पोखरून गेलंय्. असंच तापल्या तव्यावर होरपळतंय्.

७) पिळल्या धुण्यासारखी ती तिथेच तशीच सुकत चाललीय.

भरल्या संसारात स्त्रीचे किंवा पुरुषाचे एकाकीपण रंगवणाऱ्या, कुटुंबाचे विघटन दर्शविणाऱ्या वहुतेक कथा असल्या तरी ढोबळ मानाने तीन प्रकारांत कथांची वर्गवारी होऊ शकेल.

१) ऐतिहासिक पार्श्वभूमीवरच्या कल्पनारम्य कथा - दायमाँ, गुजरी, कोहिनूर.

२) रिमांड होम, कारागृह यात डांबल्या गेलेल्या व्यक्तींच्या कथा - उद्ध्वस्त, घे लिहून, नाही, सुमीता, सीमा, जन्मठेप.

३) वृद्ध व्यक्तींविषयीच्या कथा - वृद्धाश्रम, प्राक्तन, अडगळ, माई, सोवत, निवृत्ती, भूक.

विधवा, घटस्फोटिता, कुमारी माता, कॉलगर्ल, वेडसर-गुन्हेगार व्यक्ती, रखेली अशा विविध प्रकारच्या व्यक्तींनी ज्योत्स्नाबाईंचे कथाविश्व गजबजलेले आहे. विवाह आणि मातृत्व या स्त्रीजीवनातल्या दोन महत्त्वाच्या घटना. त्यामुळे स्त्रियांच्या जीवनाचा तोल गेला तर सगळे आयुष्य घरंगळत जाते. म्हणून, वाईट मुलाला जन्म देऊन आपण विषारी सर्पाला जन्म दिला, अशी खंत असणाऱ्या माता त्यांच्या कथांमध्ये जशा भेटतात, तशाच विसंवादी विवाहातून करावा लागणारा संभोग सहन करणाऱ्या स्त्रियाही भेटतात. नायिका दु:ख सोसतात, पण विषम समाजरचनेला दोषी धरत नाहीत. भोग आणि संभोग एकाच ताटात घेऊन जेवता आला असता तर ! असे त्या नायिकांना वाटते. ज्योत्स्नाबाईंनी श्रद्धावान स्त्रीच्या समर्पणशीलतेची ताकद

बघितली आहे. त्याचप्रमाणे नव्या जगात शिक्षणाने, कर्तृत्वाने, पुरुषांपेक्षा काकणभर सरस असणाऱ्या स्त्रीचा कोंडमाराही बघितला आहे. ज्योत्स्नाबाई त्याचे फक्त चित्रण करुन वाचकांपुढे ठेवतात. मार्ग दाखवायच्या फंदात पडत नाही. त्यामुळे त्यांच्या नायिका दोन्ही प्रकारच्या आहेत. दुभंगलेल्या वाटाव्यात, अशा. स्त्री-विकासाच्या काळात हाही एक टप्पा होता. तो ज्योत्स्नाबाईंनी अचूक पकडला. अर्धवट अवस्थेचा.

निर्मिती प्रक्रिया मोठी गूढ असते. पण ज्योत्स्नाबाईंनी तिचे रहस्य सांगून टाकले आहे. आपल्या नायिकेला त्या म्हणतात,

''जणू माझ्या आत्म्यानं दुसऱ्या आत्म्याला जन्म दिला. तू तर माझीच प्रतिमा होतीस. आरशात स्वत:ला पहावं, तशी तू स्पष्ट दिसत होतीस मला. तू जन्म घेतलास तो माझ्यातली सगळी वेदना घेऊन. माझा संताप, चीड आणि अपमान पिऊनच तुझं पोषण झालं. माझ्यातली बंडखोर मी तुझ्या रूपानं माझ्या पुढ्यात उभी राहिले. तुला जन्म दिला तेव्हा मी फार एकटी, एकाकी होते. तुला निर्माण केल्यावर मात्र मी कधीच एकटी, दु:खी-कष्टी राहिले नाही. त्या वेळची माझी सगळी दु:खं तू प्यायलीस. ते दु:ख कधी अनुभवलेलं होतं, कधी ऐकलेलं तर कधी पाहिलेलं होतं. डोळे माझे, दृष्टी तुझी. आवाज माझा, शब्द तुझे, सुख-दु:ख माझे, भोगवटा तुझ्या वाट्याला. असा व्यवहार आपल्या दोघींतला.''

इतके ते एकरूपत्व आहे.

ज्योत्स्नाबाईंच्या कथांची लांबी फार नसते. त्या थोडक्यात संघर्ष रेखाटतात. त्या घटनाप्रधान असतात.

त्यांनी कथालिखाण केले ते नवोदित म्हणून मुळीच नव्हते. कारण कथासंग्रहांपूर्वी 'कल्याणी' आणि 'घर गंगेच्या काठी' या दोन यशस्वी कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या होत्या. लिखाणाचा भक्कम अनुभव पाठीशी होता. ८० वे दशक हा त्यांच्या अगदी बहराचा काळ होता आणि त्याच काळात त्यांचे 'धुम्मस' आणि 'फिलर' हे दोन उत्तम कथासंग्रह (शिवाय आणखी तीन-चार) प्रसिद्ध झाले.

हिंदी आणि बंगाली साहित्यावर पिंड पोसलेला असल्याने तो कस ज्योत्स्नाबाईंच्या कथांमध्ये उतरणे अगदी स्वाभाविक होते. केवळ स्त्रीला इतक्या कोनांमधून न्याहाळणारी कथा मराठीत ज्यांनी लिहिली, त्यात ज्योत्स्नाबाईंचे नाव मानाने घ्यावे लागेल. □

आशा कर्दळे, इंद्रायणी, पत्रकारनगर, सेनापती बापट मार्ग, पुणे ४११ ०१६.

---

**अभीष्टचिंतन**

सुप्रसिद्ध विचारवंत डॉ. भा. दि. फडके दि. १३ मे २००० रोजी आपल्या वयाची ७५ वर्षे पूर्ण करीत आहेत. त्यानिमित्त त्यांना दीर्घायुष्यासाठी हार्दिक शुभेच्छा ! त्यांच्या लेखनाचा आढावा घेणारा विस्तृत लेख पुढील अंकात प्रकाशित होत आहे.

संपादक

# ज्योत्स्ना देवधर : ‘स्वयंप्रज्ञ’ लेखिका



कल्याणी हर्डीकर

पाश्चात्त्य नाटककार इब्सेन म्हणतो, ‘लिहिणे म्हणजे बघणे. आपल्या दोन डोळ्यांनी जगाचा विराट, गुंतागुंतीचा संसार बघणे आणि त्यातल्या काही भागाला उद्‌गार देणे.’ ललित-लेखन हा लेखकाचा असा उद्‌गार असतो. ज्योत्स्नाबाई देवधर यांच्या ललित-लेखनाचा आस्वाद घेताना इब्सेनच्या या उद्‌गारांचा आधार घ्यावासा वाटतो. कारण ज्योत्स्नाबाईंनी अनेक वर्षे जग पाह्यलं ते आंधळ्या माध्यमाचं.

आकाशवाणी हे खरं तर आंधळं माध्यम. फक्त भावभीन्या शब्दांवर आणि समर्थ चुंबकीय ध्वनींवर या माध्यमाची सारी भिस्त. नेमके अचूक, सुबोध शब्द आणि त्या शब्दांची सुरस, आकलनशील रचना हे या माध्यम लेखनासाठी आवश्यक असणारे गुण. कुठेही दुर्बोधता येऊ न देता, समोरच्या श्रोत्याला आपल्या लेखनाने, वाचनाने एका जागी खिळवून ठेवणे हे कसब कोणालाही जमेल असे सहजसाध्य कसब नाही. शब्दांवरची घट्ट पकड, भावनांचा लडिवाळपणा आणि अनुभूतींमधला सच्चेपणा ज्याच्याजवळ आहे, तोच या आंधळ्या माध्यमाला सरूपतेचा चैतन्यस्पर्श देऊ शकतो. असा अलौकिक चैतन्यस्पर्श देण्याचे सामर्थ्य ज्योत्स्नाबाईंजवळ होते. म्हणूनच उणीपुरी दोन तपे त्या पुणे आकाशवाणीवर ‘गृहिणी’मधून नाना प्रकारचे कार्यक्रम सादर करीत, स्वत: लिहीत, इतरांकडून लिहून घेत राहिल्या.

आकाशवाणी हे जनसंपर्काचे प्रभावी माध्यम. लोकशिक्षणाचे प्रभावी साधन. जनमत घडणीसाठी, ज्ञानप्रसारासाठी आकाशवाणीइतके दुसरे कोणतेच प्रभावी माध्यम नाही. भारतासारख्या विकसनशील देशात या संपर्क माध्यमाने कितीतरी सकारात्मक कार्य ज्ञानदानाच्या संदर्भात केले. आज जी दुरवस्था आकाशवाणीला आली आहे, त्याची कारणे अनेक असतील, पण पंधरा-वीस वर्षांपूर्वी आकाशवाणी हे खरोखरच प्रतिभावंत साहित्यिकांचे, कलावंतांचे केंद्र होते. पु. ल. देशपांडे, वा. भ. बोरकर, वा. सी. मर्ढेकर, व्यंकटेश माडगूळकर हे सारे दिग्गज साहित्यिक आकाशवाणी केंद्रावर काम करीत होते. ज्योत्स्नाबाई देवधरही त्यांच्यात होत्या. संपर्क माध्यमामधले काम आणि साहित्य प्रपंच करणाऱ्या ज्योत्स्नाबाई या त्या वेळच्या एकमेव मराठी लेखिका असतील. छोट्या छोट्या अर्थपूर्ण वाक्यांमधून चित्रमयता निर्माण करण्याची बाईंची शैली बहुधा या माध्यमाच्या सेवेची देणगी असावी. देणगीपेक्षा तपश्चर्या असावी, असे मी म्हणेन. उदा. ‘शेंगेतून दाणा फुटावा तसं तिचं शरीर वेदनेनं फुटलं.’ किंवा ‘तिचा चेहरा साजुक तुपात केलेल्या शिऱ्यासारखा समाधानानं तकतकला...’ अशी लक्षात राहण्यासारखी अस्सल स्त्रीवादी वाक्ये त्यांच्या लेखनात असंख्य आढळतात.

ज्योत्स्ना म्हणजे चांदणे, चांदण्याला जसा एक मंद, मदालस गंध असतो, तसा सौम्य शीतलतेचा, अनाहत आत्मीयतेचा अंगभूत गंध बाईंच्या सगळ्याच लिखाणाला आहे. वैचारिक



अनुक्रमणिका






तर्ककर्कशता त्याच्या लिखाणात नाही. तार्किक प्रमेये कुठेही नाहीत. आपण काहीतरी विलक्षण वेगळे सांगणार आहोत, बंडखोर विचार मांडणार आहोत असा आवही कुठेही नाही. सत्त्वशील मनाने, सुसंस्कारित हृदयाने जशा त्या जगल्या, तसेच त्यांचे ललित-लेखन आहे. निवळशेख पारदर्शी. वाईंनी साहित्याच्या सर्वच प्रकारांमध्ये लीलया संचार केलेला आहे. कथा, कादंबरी, नाटक, ललितगद्य, छोट्यांसाठी उद्‌बोधक मनोरंजक बालकथा इत्यादी. ललित-लेखनात ज्योत्स्नाबाईंच्या चिंतनाचा विषय घर, घरातली माणसे, त्यांचे परस्परांशी असलेले भावसंबंध, त्या संबंधांमध्ये येणारे, तुटलेपण आणि अपरिहार्यपणाने येणारे एकटे एकाकीपण मनाला भिडणारे आहे. ज्योत्स्नाबाईंच्या कथा-कादंबऱ्या हा चिंतनाचा विषय आहे, तरीही जाता जाता असे विधान नोंदवावेसे वाटतेच की, त्यांच्या कथांमधून आणि कादंबऱ्यांमधून आलेला सेक्सचा विषय हा इतर लेखिकांच्या तुलनेने अधिक वृत्ती-गांभीर्याने आलेला आहे. उदा. कुँवरनी.

ज्योत्स्नाबाईंच्या ललित-लेखनासंबंधी, आकाशवाणीवरील त्यांच्या कारकिर्दीसंबंधी मी टिपण लिहावे, असे संपादकांनी म्हटल्यावर मी तावडतोब ते मान्य केले. कारण ज्योत्स्नाबाईंनी ज्या अनेक लेखक-लेखिकांना आकाशवाणी माध्यमासाठी लिहिते केले, त्यातली मीही एक होते. 'प्रत्येक माध्यमाचे एक स्वतंत्र वैशिष्ट्य असते आणि सामर्थ्य असते. ते सामर्थ्य आत्मसात करून मगच त्यासाठी लिहिते होता येते. तुम्ही कितीही मोठे लेखक असा, आकाशवाणीसाठी लेखन करताना त्या माध्यमाची नस पकडल्याशिवाय तुमचे लेखन सुश्राव्य होऊच शकत नाही.' हा

***श्रीमती ज्योत्स्ना देवधर यांचे ललितलेखन***

- *हो-नाहीच्या उंबरठ्यावर, व्हीनस प्रकाशन, १९६६*
- *निर्णय, नीलकंठ प्रकाशन, १९८९*
- *एरियल, मेनका प्रकाशन, १९९०*
- *आठवणींचे चतकोर, नवचैतन्य प्रकाशन, १९९०*
- *महाराष्ट्र राष्ट्रभाषा, १९९३*
- *योगी अरविंद - किशोर मित्रांसाठी, नवचैतन्य प्रकाशन, १९९५*
- *'रमाबाई', लोकभारती प्रकाशन, १९९६*
- *मूठभर माणुसकी, नवचैतन्य प्रकाशन, १९९८*
- *कल्याणी (नाटक हिंदी),*
- *तेजस्विनी, नवचैतन्य प्रकाशन, जानेवारी २०००*

धडा ज्योत्स्नाबाईंनी अनेक प्रतिभावंतांना अनेकदा दिला.

ज्योत्स्नाबाईंची आकाशवाणीची कारकीर्द १९६० ते १९८४ अशी दोन तपांची. या कारकिर्दीचा वेल्हाळ रोचक आढावा 'एरियल' या त्यांच्या आत्मचरित्रात्मक आठवणी स्वरूप पुस्तकात वाचायला मिळतो. त्या स्वतःच या पुस्तकासंबंधी म्हणतात, 'एरियल हे माझं आत्मचरित्र नाही. पण माझ्या आयुष्यातील अत्यंत महत्त्वपूर्ण अशा दोन तपांचा आलेख मात्र आहे. माझ्या जीवनाला नवं वळण, नवी दिशा देणाऱ्या अनुभवांचा आठव आहे...'

मनामनांच्या अदृश्य तारा जुळून भावनिक संपर्क प्रस्थापित करू शकणारी 'एरियल' खऱ्या अर्थानं एरियल आहे.

कारण ज्योत्स्ना देवधर नामक कोणी एक सरळसाधी, सरधोपट जीवन जगणारी सर्वसामान्य स्त्री एक दिवस अगदी अचानक ध्यानीमनी नसताना आकाशवाणी, पुणे केंद्रावर 'गृहिणी' विभागाची निर्माती म्हणून निवडली जाते आणि मग एक वेगळेच आकाशवाणीचे जादुई विश्व तिच्या कसे वाट्याला येते, याचा हृद्य आढावा या 'एरियल'मध्ये आहे.

एका अ-मराठी भाषीक स्त्रीने मराठीतील आघाडीची लेखिका म्हणून कसा कसा प्रवास केला, त्या धडपडीचाही इतिहास यात आहे. एरियल एकाच वेळी ज्योत्स्नाबाईंच्या व्यक्तिमत्त्वाचा तीन पातळ्यांवरच्या प्रवासाचा वेध घेते. पहिली पातळी आहे, सर्वसामान्य संसारी, वाळवोध स्त्रीचे समर्थ अधिकारी स्त्रीमध्ये कसे कसे रूपांतर झाले; दुसरी पातळी एका अधिकारी स्त्रीची वाटचाल, संपर्क-माध्यमासारख्या 'चौकात बसलेल्या' व्यक्तीसारखे एक स्त्री म्हणून त्यांना आलेले अनुभव आणि तिसरी पातळी त्यांच्यातल्या सर्जनशील व्यक्तिमत्त्वाची आकाशवाणी-सारख्या प्रसिद्धी-माध्यमाच्या संस्कारांमुळे झालेली जडणघडण. एका संवेदनशील व्यक्तिमत्त्वाने डोळसपणाने न्याहाळलेले हे 'आंधळे आवाजाचे जग.'

ज्योत्स्नाबाईंच्या व्यक्तिमत्त्वाच्या जडणघडणीचा हा जसा आलेख 'एरियल' चितारते, तसाच आकाशवाणीच्या गतिस्थितीचाही आलेख ती आपसूक चितारते. ज्योत्स्नाबाईंचे सहृद असणारे ख्यातकीर्त लेखक गोपीनाथ तळवलकर, व्यंकटेश माडगूळकर, वा. भ. बोरकर, पुरुषोत्तम जोशी यांच्या व्यक्तिमत्त्वांच्या वैशिष्ट्यांसकट त्यांची व्यक्तिचित्रणे बाई आपल्या समर्थ शब्दांमध्ये वाचकांसमोर उभी करतात. आकाशवाणीचा कारभार, तिथली माणसे, तिथले सहकारी, त्यांचे स्वभाव, कामाची शिस्त, त्या माध्यमामध्ये काम करताना ठेवावा लागणारा अष्टावधानीपणा, एखाद्या लहानशा वाटणाऱ्या नजरचुकीमुळे पुढे आयुष्यभर भोगावा लागणारा मनस्ताप, बाई मोठ्या मिस्कील शैलीत सांगतात आणि त्यामुळे आकाशवाणीच्या संदर्भात आलेले कितीतरी जिवाला कळा लावणारे अनुभव कळीदार होऊन जातात. मग तो अनुभव उत्तम सादर केलेल्या नाटकाचा सर्व परिणाम धुवून काढणाऱ्या एखाद्या विसंगत गाण्याची टेप लावून घडलेला असो, अगर 'घर गंगेच्या काठी' या चित्रपटाची पटकथा लिहिली म्हणून स्टेशन डायरेक्टरने बाईंची चौकशी केल्याचा असो, अगर स्वत:च्या 'असो' म्हणण्याच्या लकबीच्या इतरांनी केलेल्या टवाळीचा असो... एखादी गोष्ट खुलवून फुलवून ढंगदार शैलीत, विनोदी पद्धतीने सांगण्याची बाईंची हातोटी विलक्षण आहे आणि म्हणूनच त्या 'एरियल' या आपल्या छोटेखानी आत्मचरित्रात आपल्या स्वत:कडे विलक्षण तटस्थतेने पाहू शकतात. आपल्या घडणीचा आलेख आपल्या गुण-दोषांसकट त्या रंगवू शकतात. आकाशवाणीच्या एका कालखंडाचा बोलका इतिहास म्हणूनही या पुस्तकाचे महत्त्व अनन्य-साधारण आहे.

साहित्य, कला, सर्वच सामाजिक क्षेत्रे, राजकारण, धर्म, अर्थ-विज्ञान, अध्यात्म, आरोग्य हे विषय त्या विषयातले सर्व तज्ज्ञ, त्यांची सर्वसामान्य स्त्रियांना रुचतील-पटतील अशी व्याख्याने ठरवणे, ती व्याख्याने कंटाळवाणी ठरू नयेत, म्हणून विषय तेच पण त्यांना उद्‌बोधक, रंजकतेचे रूप देण्यासाठी वापरलेले संवादाचे, तर कधी मुलाखतीचे तर कधी डॉक्युड्रामाचे

स्वरूप आणि त्या निमित्ताने हाताळलेले शेकडो विषय आणि शेकडो आठवणी त्या सांगत जातात. त्या आठवणींमागचा मी स्वत:चे कुठेही अवडंबर माजवत नाही; उलट त्या आठवणींमागच्या ग्रेट माणसांचे ऋणच तो कृतज्ञतेने व्यक्त करीत जातो. मग ते चोवीस वर्षांत झालेले बारा स्टेशन डायरेक्टर असोत अगर डॉ. शरद किणीकर, डॉ. ह. वि. सरदेसाई, शोभना रानडे, भालबा केळकर, प्राचार्य शिवाजीराव भोसले, अगर डॉ. अशोक कामत असोत किंवा के. नारायण काळे, सई परांजपे... कोणीही कार्यक्रम करायला येणारी व्यक्ती तिच्या तिच्या खास वैशिष्ट्यांसकट, लकबींसकट ज्योत्स्नाबाईंनी उभी केली आहे. त्यांच्या त्यांच्याकडून आपण काय काय गोष्टी आत्मसात करण्याचा प्रयत्न केला, हेही अत्यंत मनमोकळेपणाने त्यांनी सांगून टाकले आहे.

ज्योत्स्नाबाई बहुश्रुत आहेतच पण जिद्दी, कष्टाळू आहेत. निराश होणे, नाउमेद होणे त्यांच्या स्वभावाला नामंजूर आहे. आयुष्यातल्या भिंगुळून टाकणाऱ्या स्वजनांच्या मृत्यूनंतरही ताठ उभ्या राहणाऱ्या त्या आपला जीवनाधार योगी अरविंदांच्या Post Mistakes मध्ये किंवा व्हर्जिनिया वुल्फच्या Movements of Being मध्ये शोधू पाहतात. मृत्यूचे सत्य Jean's Day सारख्या स्वेच्छामरणाची भलावण करणाऱ्या पुस्तकात त्या शोधतात. पंडिता रमाबाईंचे व्यक्तिमत्त्व म्हणजे जीवनाधार समजतात. पुस्तकांच्या कुशीत, लेखणीच्या उबेत आपण सन्मानाने झोपू शकतोय... हे भाग्य आपल्याला लाभले आहे, म्हणून आयुष्याला कृतज्ञ राहतात. उरलेले आयुष्य एकटे असले तरी चवीने चाखण्याची अदम्य जिजिविषा त्या बाळगतात.

**डॉ. कल्याणी हर्डीकर**
एम.ए.पीएच्.डी., बी. एड.
सरस्वती मंदिर संस्थेच्या रात्र महाविद्यालयात मराठी विभागप्रमुख, व्याख्याती.
'रंगनाटक आणि नभोनाटक रूप आणि स्वरूप' या विषयावर संशोधन आणि विद्या-वाचस्पती पदवी प्राप्त.
१९७५ ते ९७ पर्यंत एकूण अकरा लघुकादंबऱ्याचे लेखन आणि दिवाळी अंकांमधून प्रकाशन.
'पुत्र अमृताचे' आणि 'स्वप्नमग्न' या विशेष कादंबऱ्या प्रकाशित.
राजस, योगिता, स्त्री, मनोहर, किर्लोस्कर, एकता, धर्मभास्कर आदी मासिकांतून शंभराहून अधिक कथा प्रकाशित. 'मनोहर' व 'महाराष्ट्र टाईम्स' कथास्पर्धेत पारितोषिके.
विविध ठिकाणी शंभराहून अधिक ललितलेख प्रकाशित.
सकाळ, केसरी, तरुणभारत आदी वृत्तपत्रांतून विविध लेखन प्रकाशित.
आकाशवाणी पुणे केंद्रावरून विविध सदरांसाठी संहितालेखन. कामगार कल्याण मंडळाच्या त्रैमासिकाचे १९९१ ते ९३ कार्यकारी संपादक.

मराठीत अनेक लेखिकांनी आपली आत्मचरित्रे लिहिली पण 'एरियल' हे निश्चितच त्या सर्वांहून वेगळे आहे. कारण इथला झगडा फक्त आपणाशी नसून प्रसिद्धी-माध्यमाशी, तिथल्या असंख्य प्रथा-पद्धतींशी आणि स्वत:च्या आत्मसंकल्पनेशी होता.

ज्योत्स्नाबाईंचे व्यक्तिमत्त्व नीतिमूल्ये,










रूढी, परंपरा मानून, सांभाळून आधुनिकतेचा वेध घेणारे व्यक्तिमत्त्व आहे. ते समंजस, सोशीक जसे आहे, तसेच विचारी आणि बंडखोर आहे. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे असे विविध पैलू त्यांच्या ललित गद्यातून वाचकाला अनुभवायला मिळतात. 'आठवणींचे चतकोर' हे त्यांचे ललितगद्यपर पुस्तक. यातही आठवणींच्या येरझाऱ्या आहेत. एखाद्या बातमीच्या निमित्ताने मनात उठलेले आठवणींचे मोहोळ, गतकाळ आणि वर्तमान वास्तव यांची सांधेजोड करीत त्या स्वत:चे चिंतन शब्दरूप करत जातात. त्यात आठवणी जशा शुभेच्छांच्या आहेत, पुस्तकांच्या, माणसांच्या आहेत, तशाच रस्त्यांच्याही आहेत. रँग्लर परांजपे रस्त्याच्या आठवणीच्या निमित्ताने त्या तरुण पिढीवर, तिच्या मर्मावर नेमके बोट ठेवतात. 'शारदासदन' ते 'मुक्ती मिशन'च्या निमित्ताने स्त्री-शिक्षणासाठी झगडणाऱ्या, धोंडो केशव कर्वे, पंडिता रमाबाई, महात्मा फुले यांच्या कार्याचा आढावा घेतात. 'झुळूक होळीची' मधून आकाशवाणी वरून होळीचे केलेले नाना स्वरूपी कार्यक्रम निवेदन करतात, तर दोन घटनांच्या निमित्ताने शोक भावभावना अभिव्यक्तीची चिकित्सा करतात. निबंधाच्या विषयाच्या निमित्ताने स्त्री-पुरुष समानतेच्या वास्तवावर त्या कोरडे ओढतात. 'नारदा'च्या निमित्ताने मनाची, मनात कोंडलेल्या भावभावनांची सुटका कशी करावी, हे सुचवतात. 'माणुसकीचे' पदरमधून मानवी भावसंबंधांची नजाकत दाखवत शेवटी इच्छामरणाचे समर्थन त्या करत जातात. रेल्वे प्रवासात भेटलेल्या देवमाणूस स्त्रीच्या, आपण स्त्री असण्याच्या भयाला कसा छेद देतो, याचे त्या वर्णन करतात. 'प्रेम देता का हो प्रेम'मध्ये त्यांनी जुनी पिढी आणि नवी पिढी' यांच्यातल्या वर्तन व्यापाराचा घेतलेला वेध हा चिंतनीय आहे. 'पुस्तक भेट' या लेखातून तर त्यांनी स्वत:शी जोडून घेतलेले अनेक प्रतिभावंतांचे भावसंबंध अत्यंत तरलपणाने व्यक्त केले आहेत. 'युवा मैत्रिणींनो', 'मागची पिढी - पुढची पिढी' या लेखांमधून आयुष्याला सुखी करण्याचा वर्तनमंत्र द्यायचा प्रयत्न त्यांनी केला तर 'दुर्दम्य' आणि 'मरणमोह'मधून मृत्यूवरचे, इच्छा मरणावरचे काव्यात्म चिंतन त्यांनी केले आहे. हे सारे ललितलेख छोटेखानी आहेत. स्मरणसाखळी रूप आहेत. त्या पंचवीस लेखांमधून ज्योत्स्नाबाईंची आयुष्याकडे बघण्याची दृष्टी, त्यांची वृत्ती आपल्याला दिसते. छोट्या छोट्या घटना प्रसंगांमागचे चिंतन-मनन आपल्याला जाणवून जाते.

'मूठभर माणुसकी' हे त्यांचे भारतीय कौटुंबिक मूल्यांचे आधुनिक संदर्भ देणारे दुसरे ललितगद्याचे पुस्तक.

कुटुंबसंस्थेचे विघटन हा महानगरातील जीवनप्रणालीचा एक अटळ परिपाक. चौकोनी कुटुंबाच्या समस्याही अत्यंत जटिल स्वरूपाच्या. नोकरी करणारे पती-पत्नी घरापेक्षा घराबाहेरच अधिक. संसारात परस्परसंबंध टिकतात ते प्रेम, सौहार्द, मानसिक सहिष्णुतेमुळे. पण असे संबंध निर्माण व्हायला जी जवळीक, वेळ लागतो, तो द्यायला आधुनिक युगात सवड आहे कुणाला? साऱ्याच गोष्टींचे वेळापत्रक ठरून गेलेले, सारेच घाईघाईने... नव्या पाहुण्याचे आगमन, त्याचे संगोपन, त्यामुळे घरात वाढणारे ताण, कामाचा आणि नोकरीचा ताण, सासू-सुनेच्या संबंधांतले ताण, सासर-माहेरच्या माणसांमुळे निर्माण होणारे ताण, शारीरिक संबंधांमुळे निर्माण होणारे ताण, असे अनेक ताण सोसत झेलत जगणारी आधुनिक गृहिणी, तिची

मानसिक घुसमट, तिची जीवघेणी ससेहोलपट ज्योत्स्ना देवधरांनी 'मूठभर माणुसकी'मधून रंगवताना काही भाष्ये केली आहेत. काही ठिकाणी उपाययोजना सुचविलेल्या आहेत. मध्यमवर्गीय चौकोनी कुटंबांनी सहजपणाने षट्कोनी बनावे, वृद्धांना सामावून घ्यावे, असे त्यांना प्रांजलपणाने वाटते.

मानवी संबंधांमध्ये, नात्यांमध्ये जिव्हाळ्याची ऊब हवी. पैसा, हक्क, मोजून मापून काम असा हिशोबीपणा त्यात येऊ नये, असे त्या सुचवतात. तरुण मुलींच्या शीलाची चिंता पालकांना पडते, त्यापेक्षा तिच्या मनोभंगाची चिंता पालकांनी करावी, असे त्या रोखठोक बजावतात. अपराध, पाप, स्खलन यांचा बाऊ स्त्रियांनी मुळीच करू नये, उलट प्रेमाने, मायेने स्त्रीने स्त्रीचा विचार करावा, असे त्या मांडतात. स्वातंत्र्य, समता अधिकार हवेतच; पण त्या नाण्याची दुसरी बाजू म्हणजे सामंजस्य, विवेक, शहाणी वागणूक, हे विसरता कामा नये. असे त्या बजावतात. व्यक्तिस्वातंत्र्याच्या जल्लोषात माणूस स्वत:पासूनच तुटतो आहे. भोगात, चंगळवादात सारे काही चटपट मिळवण्याच्या नादात कष्ट, संयम, शिस्त, प्रतीक्षा, धडपड हे तो विसरतो आहे. आयुष्यात दु:ख निर्माण होण्याचे खरे कारण, महत्त्वाचे कारण नेमके तेच आहे, अशी ज्योत्स्नाबाईंची ठाम भूमिका आहे. पुरुषाशी फटकून राहण्याचा आणि अपत्य संगोपनाचे झेंगट टाळण्याचा त्या कडवा विरोध करतात. स्त्री-मुक्तीवादाचे अविवेकी समर्थन त्या करीत नाहीत. पुरुषनिरपेक्ष जीवन जगण्याचा किंवा पुरुषसत्ताक शोषणाचा निषेध करण्याचा आंधळा स्त्रीवादी अभिनिवेशही त्यांच्या कोणत्याच लेखनात आढळत नाही. भारतीय कौटुंबिक जीवनाचा आदर्श त्यांना प्रिय आहे आणि त्यांचे हे सुस्पष्ट विचार म्हणजेच 'मूठभर माणुसकी' आहे. यात एकूण छत्तीस ललित लेख आहेत.

त्या कुटुंबवत्सल होत्या आणि आहेत म्हणूनच तर त्यांच्या भोवतालचा गोतावळा त्या अजूनही टिकवून आहेत. लळा, जिव्हाळा, कौटुंबिक भावसंबंध या गोष्टी ज्योत्स्नाबाईंच्या लिखाणाच्या अविभाज्य भाग आहेत. ज्योत्स्नाबाईंचे अगदी पहिले सुरुवातीचे पुस्तक 'हो-नाहीच्या उंबरठ्यावर' असेच कन्या आणि मातेच्या भावव्याकुळ संबंधांवर आधारलेले पत्रसंवादाचे पुस्तक आहे. (१९६६ साली) अनुराधा ऊर्फ अनू. वडील नसलेली मुलगी. शिक्षणासाठी आईपासून, भावंडांपासून दूर राहते. तिची आई शेगावला तर अनू पुण्याला. वैधव्याची अचानक कुऱ्हाड कोसळलेली असूनही अनूची आई न खचता, न डगमगता स्वाभिमानाने आपल्या तीन मुलांना वाढवते. आपल्या आदर्शांना जपते. कर्तव्यांना ठाम राहते. नातलग मंडळींना एका विशिष्ट अंतरावरूनच सांभाळत ती आपल्या वयात येणाऱ्या मुलीला डोळ्यांत तेल घालून सांभाळते. नीतिमत्ता, चारित्र्याचे धडे देते, सोळावे वर्ष का धोक्याचे ते समजावून, पटवून देते. पुरुषप्रधान संस्कृतीत स्त्रीने कसे वागावे याचे पाठ ती अनूला देते. हे सारे पत्ररूप आहे. वयात येणाऱ्या एका तरुणीच्या भावभावना, तिची नवथर स्वप्ने ती आपल्या आईला पत्रांमधून सूचकतेने लिहिते आणि अनूची आई तिला पत्रातूनच सारे काही सांगते. कौमार्य आणि तारुण्याच्या उंबरठ्यावर वावरणाऱ्या विद्यार्थिनींच्या जगाचे ज्योत्स्नाबाईंनी मोठे मनोवेधक चित्र पत्ररूपाने रेखाटले आहे.



अनुक्रमणिका

ज्योत्स्नाबाई खरे तर राजस्थानच्या. हिंदी त्यांची मातृभाषा, शिक्षणभाषा. हिंदीमधूनही बाईंनी भरपूर लिखाण केलेले आणि नावलौकिक मिळवलेला. मराठीत अत्यंत लोकप्रिय ठरलेली त्यांची 'कल्याणी' कादंबरी. त्याचे मराठीत नाट्यरूपांतर स्वत: ज्योत्स्नाबाईंनीच केले. कादंबरी आणि नाटक या दोन भिन्न प्रकृतीच्या साहित्यकृती, परंतु आकाशवाणीवरच्या कामामुळे आणि तेज, सजग जाणिवांमुळे रूपांतराची सामर्थस्थळे बाईंनी केव्हाच आत्मसात केल्यामुळे स्वत:चीच कादंबरी त्यांनी अगदी लीलया नाट्यकृतीत रूपांतरित केली. मराठीत नाट्यसृष्टीत 'कल्याणी'ची म्हणावी तशी दखल घेतली गेली नाही. पण हिंदी नाटकाला भरघोस प्रतिसाद मिळाला. अनुकूल असा बदल नाट्यसंहितेत केल्यामुळे अहिंदी भाषा भाषिक लेखनाचा पुरस्कार राष्ट्रपतींच्या हस्ते या नाटकासाठी बाईंना मिळाला. तसेच उत्तर प्रदेश संगीत नाटक अकादमीचा पुरस्कार, महाराष्ट्रराज्य हिंदी साहित्य अकादमीचा पुरस्कार, विष्णुदास भावे संगीत पारितोषिक असे सन्मान हिंदी 'कल्याणी' नाटकाला मिळाले.

'कॅक्टस' हा हिंदीतला कथासंग्रह. मानवी नातेसंबंधामधले ताणतणाव, भावसंबंध हाच या कथासंग्रहाचा गाभा. या त्यांच्या कथासंग्रहाला बिहार राज्य पुरस्कार मिळाला. तसाच 'अंतरा' हा आणखी एक हिंदी कथासंग्रह. दिल्लीचा अहिंदी भाषाभाषी लेखक पुरस्काराचा मान या कथासंग्रहाला मिळाला. बाईंना आयुष्यात तसे मानसन्मान अनेक मिळाले. त्यांच्या लेखनाचे असंख्य चाहते त्यांना मिळाले, त्यांच्या लेखनाला विद्यापीठाच्या स्तरावर अभ्यासक्रमात अनेकदा स्थानही मिळाले. अवघ्या लेखन प्रपंचावर संशोधनपर अभ्यासग्रंथही लिहिले गेले. एक कृतकृत्य कृतार्थ साहित्यिक जीवन बाईंच्या वाट्याला आले, हे निश्चित. पंचेचाळीस पुस्तकांची निर्मिती आजमितीस त्यांच्या गाठीशी आहे. एवढा भरला-पुरला साहित्यिक संसार घेऊन जगणाऱ्या ज्योत्स्नाबाईंना आयुष्यात नियतीने फार मोठे दोन फटके दिले. पुत्रवियोग आणि पतिवियोग; पण हे दोन हेलपांडायला लावणारे फटके त्यांनी तेजस्विनी पंडिता रमाबाईंच्या जीवनाचा आदर्श डोळ्यांसमोर समोर ठेवून पचवले.

'रमाबाई' ही हिंदीतली त्यांची कादंबरी म्हणजे मातृ-पितृ-भ्रातृ अणि पती-कन्या वियोगानंतरही निरलसपणाने समाजासाठी झटणाऱ्या एका तेजस्वी प्रकांड पंडित स्त्रीची भावगाथा आहे. आयुष्यभर दु:ख, दैन्य, दारिद्र्य, भूक आणि अज्ञानाशी लढा देऊन, समाजाशी बंड पुकारून स्त्रीच्या अस्मितेला जागवणारी, एक कनवाळू, प्रतिभाशाली स्त्री न हारता, न थकता नियतीलाच कशी शरण आणते, त्याची ही रोमहर्षक कथा या कादंबरीमध्ये ज्योत्स्नाबाईंनी मन:पूर्वक रंगवली आहे आणि अवघे एकोणिसावे शतकच त्याच्या स्वभाव वैशिष्ट्यांसकट आपल्यासमोर उभे करून काळाचा एक भव्यपट आपल्यासमोर उभा केला आहे.

मोठ्यांसाठी 'रमाबाई' ही कादंबरी, तर छोट्यांसाठी अगदी सोप्या, सहज सुंदर रीतीने 'तेजस्विनी' हे छोटेखानी पुस्तक त्यांनी लिहिले. सहजता, ओघ, सुबोधता ही त्यांच्या भाषेची वैशिष्ट्ये आहेत. आपण हिंदी भाषीक म्हणून मराठीला पेहेरावही, हिंदीचाच अशी घिसाडघाई कुठेही नाही. नीटनेटकेपणा हा त्यांचा स्वभावधर्म जसा आहे, तसाच तो त्यांच्या लेखणीचाही स्वभावधर्म आहे हे जाणवते.

*(पान ६६ वर पहा)*

श्री. अनंत जोशी (सेवानिवृत्त प्रमुख ग्रंथपाल, गरवारे महाविद्यालय) यांच्या मार्गदर्शनाखाली महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या संदर्भ ग्रंथालयाची पुनर्रचना व विकासाचे काम गेल्या वर्षापासून चालू आहे. त्यासाठी आर्थिक साहाय्य मिळविण्यासाठी आम्ही श्री. पु. कृ. गर्दे (सेवानिवृत्त प्रमुख ग्रंथपाल, युनायटेड नेशन्स, न्यूयॉर्क) यांची भेट घेतली व चार कार्ड इंडेक्स कॅबिनेटसची निकडीची आवश्यकता असल्याचे सांगितले.

त्यासाठी श्री गर्दे यांनी महाराष्ट्र साहित्य परिषेदेला दि. १० जानेवारी रोजी भेट देऊन या कामासाठी रु. ३२,०००=०० (रु. बत्तीस हजारच्या) देणगीचा धनादेश म. सा. परिषदेला दिला.




डावीकडून श्री अनंत जोशी, श्री. रंगा मराठे, (ग्रंथालय प्रमुख)
डॉ. गं. ना. जोगळेकर (कार्याध्यक्ष) श्री. पु. कृ. गर्दे, श्री. रत्नाकर कुलकर्णी (कोषाध्यक्ष)

अनुक्रमणिका

# 'गानयोगी शिवपुत्र'



दा. गो. देशपांडे

संगीत प्रवर्तक कुमार गंधर्व हे एक इंग्रजीत ज्याला लिजेंड (Legend) यथार्थतेने म्हणता येते, असे एक अभूतपूर्व व्यक्तिमत्त्व होते. आणखीन काही वर्षे उलटल्यावर संगीतात स्वरांचे चमत्कार सुरेल करणारा खरोखरीच असा कुणी प्रत्यक्षात होता काय असा प्रश्नही उपस्थित झाल्यास ते नवलाचे ठरू नये. अगदी कुमार वयातला एक कोवळा बालक मोठमोठ्या संगीत मैफिलीत दोन तंबोऱ्यांच्या मध्ये रुबाबात स्थानापन्न होऊन समोर मान्यवर संगीतातल्या श्रेष्ठ आणि ज्येष्ठ अशांच्या उपस्थितीत महान संगीतकारांची अदाकारी हुबेहूब अशी सादर करतो की, नुसते ऐकणाऱ्याला वाटावे, की बुजुर्ग गायकच गात आहे ! साथीला त्या काळात गाजलेले वाद्यकार त्याची साथ करण्यात धन्यता मानत.

छे, छे, हे खरे असू शकत नाही, कपोलकल्पितच असावे ! तथापि ते वास्तव होते आणि असा हा असामान्य कलावंत बहरात असताना क्षयग्रस्त होतो, गाणेच ज्याचा प्राण ते गायन बंद करावे लागते. अशी काही वर्षे जातात व एका भल्या पहाटे नव्या स्वरांचा थक्क करणारा अतुलनीय साज घेऊन हा पुन्हा अवतरतो. पाहता पाहता सीझरप्रमाणे येतो, गातो आणि जिंकत जातो ते अथकपणे. अथकपणे खरे परंतु अनंतपणे नव्हे. स्वर अनंत राहावे असे जे संगीताचे संचित ते अक्षयपणे राहावे असा ठेवा देऊन भरल्या ताटावरून उठून जातो. त्यालाही आता पाहता पाहता सात वर्षे उलटली. त्या दिवशीच्या रोजनिशीत नोंद आहे. 'कुमार गंधर्वांचे देहावसान झाल्याचे मी सकाळी ७॥ वा. फिरून परतलो तेव्हा सौ. नर्मदेनं सांगितलं. पहाटे तीन वाजता गेले. नवनिर्मितीचा स्रोत अडखळला-'

स्रोत अडखळला पण त्याने आरपार प्रभावित झालेले कानसेन आणि गानसेन तो स्रोत पकडून त्याची आळवणी व्हावी म्हणून तळमळ आणि तडफडीने पछाडलेले, काही कमी नव्हते. पुण्यात माझ्या पाहण्यात अशा दोन व्यक्ती : एक श्री. राम कोल्हटकर आणि दुसरे चित्रकार प्राणेश जोशी. कोल्हटकरांनी एक वर्ष दर महिन्याला एक मैफिल या संदर्भात वर्तमान ठेवून तो स्रोत जागता केला. चित्रकार प्राणेश जोशी यांनी कुमारांवर जे जे प्रकाशित होत गेले, त्याची कात्रणे एकत्र करून ती जतन केली. त्यातून कुमार सर्व अंगाने दिसावे असं साकारणं शक्य व्हावं इतकी ती हृद्य आहेत. स्वत: जोशी यांनी कुमारांची अस्सल आभा व आविष्कार कुंचल्यातून प्रकट केले आहेत. पण यापेक्षा सर्व मराठी रसिकांना कुमार ही काय चमत्काराची रागदारीतील किमया होती हे श्री. वसंत पोतदारांनी विजेची गती असलेल्या शब्दात पुस्तकरूपाने असे सादर केले की, त्याच्या दोन आवृत्त्या निघून तिसऱ्या आवृत्तीकडे त्याची आगेकूच असल्याचे कळते. तथापि कुमारांबरोवर ज्याची पहिल्यापासून गायकीत राग-सफर होती आणि

ज्याने कुमारांच्या सगळ्या भौतिक, लौकिक आणि अलौकिक स्थित्यंतरात व राग परिवर्तनात कुमारांचे पूर्णपणे गुरुत्व आणि वर्चस्व मनोमनी मानले अशा एका सहप्रवाशाने कुमारांच्या व्यक्तिमत्त्वाचा आणि त्याच्या दैवी कंठाचा वर्धिष्णु आलेख वेळोवेळी टिपून ठेवला आणि तो तसाच त्याच्या जवळ पडून राहिला. तथापि त्याची सुदैवाने रद्दी झाली नाही. तशी ती झाली असती पण तो टिपणी वजा बहुमोल 'ऐवज' एका जातिवंत जाणकार रसिकाच्या हाती पडला आणि कुमार प्रेमिकांचे जणू भाग्यच उजळले! ज्याच्या हाती हा 'ऐवज' पडला त्याने या संबंधात मोठे मर्मग्राही भाषेत म्हटले आहे - 'यांच्या नोंद वहीत व मनात जो 'ऐवज' होता, त्याला तपशीलवार व क्रमवार असे सगुण साकार रूप देण्यासाठी एखाद्या संपादकाची मध्यस्थी ही अटळच होती. ते कार्य मला करता आले हा माझ्या दृष्टीने एक सुयोगच. कारण ज्या युगसंजीवक कलाकाराची गायकी आणि त्यावरील त्यांच्या बृहस्पतिसदृश निरूपणानं, जीवनाला सर्वांगानं भिडणाऱ्या व्यक्तिमत्त्वानं आणि स्वत: मिळालेल्या त्यांच्या स्नेहाळ वागणुकीनं मी श्रीमंत झालो, त्या कुमार गंधर्वांसाठी काही करायला मिळणं ही मोठी सुवर्णसंधीच. दुसरे असे की, १९९४ मध्ये श्री. पंढरीनाथ यांनी आपल्या पुण्यातील सदनिकेवर तास सव्वा तास ज्या घटना ऐकवल्या त्या इतक्या रोमांचकारी आणि संगीतास्वादाच्या दृष्टीनं लक्षवेधी होत्या, की त्या घटना, त्यांची पार्श्वभूमी, त्यातून निष्पन्न होणारा संगीतिक विचार वगैरे संगीत रसिकांना व एकूण कुमारप्रेमींना सुसूत्ररूपात वाचायला मिळालाच पाहिजे, अशी माझी तत्क्षणी प्रतिक्रिया झाली' यातून 'गान योगी शिवपुत्र' या अवीट पुस्तकाची निर्मिती झाली. नोंद टिपणारे व त्या जतन करून ठेवणारे श्री. पंढरीनाथ कोल्हापुरे आणि त्या 'ऐवजां'चे समर्थ संपादन करणारे ख्यातनाम संगीत समीक्षक डॉ. श्रीरंग संगोराम असा समसमा संयोग झाला.

अर्थात श्री. संगोराम यांचे काम तसे सोपे

**श्री. दा. गो. देशपांडे**

साहित्य व समीक्षाक्षेत्रातील सुपरिचित लेखक.

'सिनिक'च्या कथा या आगळ्या कथालेखनातून प्रसिद्धीस आलेले १) सिनिकच्या कथा, २) सिनिक्धा, ३) प्लस सिनिक्था हे कथासंग्रह प्रकाशित.

'कवी द. रा. बेंद्रे यांचे मराठी साहित्य' हा संपादित ग्रंथ; पॉप्युलर प्रकाशन, केळकर पारितोषिक प्राप्त.

संगीत, साहित्य, चित्रकला, व्यक्तिचित्रे व 'लेबर या विषयावर प्रमुख नियतकालिकांतून सातत्याने लेखन - ६ पुस्तके होतील एवढा ऐवज.

'हाय मोगलाई' (कादंबरिका), तत्त्वज्ञान, संतसाहित्य यावरही लेखन : प्रसाद, पुरुषार्थ · यांमधून प्रकाशित.

मराठी, कानडी, तेलुगू, उर्दू, हिंदी, इंग्रजी भाषा अवगत.

लेबर कमिशनर, पुणे विभाग या पदावर शासकीय सेवाकार्य.

नव्हते. कोल्हापुरेंनी स्वत:च म्हटलं आहे की, '१९४९ व नंतरच्या घटनांची तारीखवार नोंद ठेवीत गेलो. मग १९४६ ते ४८ च्या घटनांचीही आठवणीमधून मी नोंद केली. असा हा क्रम ६६-६७ पर्यंत चालला. नोंदवही तशी बरीचशी त्रोटक.' कुमारांच्या गान प्रवासातल्या तीन महत्त्वाच्या टप्प्यांचा समर्पक उल्लेख त्यांनी केला आहे. पहिला 'पंडितांच्या नकला संपवून त्यांच्या घरंदाज गायकीचा आत्मा आत्मसात करून ते पुढे थेट एका स्वतंत्र गायकीच्या सीमेवर येऊन उभे राहिले' आणि नंतर जीवघेण्या आजाराने ग्रासले. तो आजार आला तरीही आतली गान चित्शक्ति स्वरांचा नवा वेध घेण्याच्या जागरणात होती. त्यात परत गाण्याचा विलक्षण असा आत्मविश्वास होता. त्याचा आधार होता 'आतील' मूक गान तपस्या. हे तिसऱ्या टप्प्याकडे येणे होते. कोल्हापुरेंनी म्हटलेच आहे की, 'पुढे देवाच्या कृपेने व आम्हा सर्वांच्या नशिवाने हा खडतर वनवास संपवून कुमारजी गाऊ लागले. घन-गगन बोलू लागले, सण-त्योहार नटू लागले, ऋतू गाऊ लागले आणि पुढे आमचं संगीत आणि आमचं जीवन बहरून, खुलवून कुमारजी गंधर्व लोकी निघून गेले.' या संदर्भात कोल्हापुरेंनी एक हृद्य प्रसंग वर्णिला आहे. कुमारांच्या शेवटच्या आजारात ते कुमारांना भेटावयास गेले तेव्हा परत जाताना कुमार म्हणाले, 'अरे पंढरी परत ये. तुझ्याशी बरंच बोलायचं आहे. हे पहा, माझं काम हे असंच चालू राहिलं पाहिजे... कळलं ना तुला?' कोल्हापुरेंचं पुस्तक हे एक कुमारांनी अपेक्षिलेले पुढचं कामच आहे आणि हे काम कसं झालं? कुमारजी गेल्यानंतर कुमारजींवर श्रद्धांजली वाहण्याकरता जी सभा झाली, त्यात बोलताना कोल्हापुरेंनी कुमारांचे वर निर्देशिलेले तीन टप्पे आणि त्यांनी ठेवलेल्या नोंदवहीचे वाचन ऐकून श्री. संगोरामजी त्यांना भेटावयास गेले आणि त्या नोंदवहीचं भाग्य उजळलं.' कारण नोंदवहीत जे जे होतं ते मोलाचं होतं, तथापि ते 'पडद्याआड' होतं. संगोरामजींना यातून एक सुंदर पुस्तक साकारावयाचा अस्सल कच्चा माल (Raw Material) असल्याचे जाणवले. या संबंधानं संगोराम कोल्हापुरेंना म्हणाले, 'मी तुमचे हे पुस्तक करून देईन. तुम्हाला प्रकाशक देखील मिळवून देईन. या पुस्तकाचे मोल फार आहे.' आणि संगोरामांनी हे म्हटल्याप्रमाणे करून दाखवले आणि मराठी वाचकांना एक ठेवा लाभला !

गानयोगी शिवपुत्र हे पुस्तक दोनशे पानांचे आहे. त्याला कुमारांबरोबर गान साधनेत व संगतीत आणि संगीतातही राहिलेल्या श्री. चंद्रशेखर रेळे यांची सुरेख प्रस्तावना आहे. कोल्हापुरेंचे अतिशय वाचनीय निवेदन आहे आणि ह्या पुस्तकाचे ज्या अद्वितीय कल्पकतेने, चिकाटीने, आस्थेने आणि पुढाकाराने ज्यांनी संपादन केले त्या संगोरामजींचे अतिशय उद्बोधक आणि फुशारकीचा अभाव असलेले वाचलेच पाहिजे असे मनोगत आहे. हे सुरुवातीचे सर्व वाचल्यावर पुस्तक वाचण्याची जी अनिवार ओढ निर्माण होते, त्याची खुमारी काही और आहे. नंतरची जी प्रकरणे आहेत, ती अशी १) मी पंढरीनाथ कोल्हापुरे, २) स्कूल ऑफ इंडियन म्यूझिक आणि कुमार, ३) भानुमती आणि कुमार गंधर्व, ४) संगीतातील नवसर्जन, ५) उत्तर दिग्विजय, ६) परिक्रमा, ७) परिशिष्ट - १, २, ३. या प्रकरणांवरून कुमारांच्या गान अस्मितेला, अफाट

आवाक्याला, नवतेचा वसा घेतलेल्या आविष्काराला आणि अलौकिक संगीताच्या 'देण्याला' असलेल्या असामान्य पैलूंची कल्पना येईल.

कुमार एकदा म्हणाले होते की, माणसाला स्वत:त काय विशेष देवाने दिलेलं आहे, हे कळलं पाहिजे आणि ते कळल्यावर त्या विशेषांचा गुणाकार करण्याच्या दिशेने मार्गक्रमणा झाली पाहिजे. कुमारांनी या दिशेनेच आपली साधना तन-मनाने वर्तमान आणि वर्धमान ठेवली ती अविरत. या पुस्तकातील 'मी पंढरीनाथ कोल्हापुरे' हे प्रकरण अतिशय बोलके आहे. शीर्षक जरी कोल्हापुरे या नावाशी निगडित असले तरी त्यात कुमारांच्या साधनापर्वाची सुरुवात कुमारांच्या आयुष्यात आलेल्या, दैवी योगाची ती निदर्शक आहे. स्वत:च्या संगीत शिक्षणाकरता मुंबईस आलेल्या कोल्हापुरेंना देवधरांच्या संगीत शाळेत प्रवेश मिळाला आणि येथेच ज्या कुमारांबद्दल खूप खूप कुतूहल निर्माण होणारे ऐकले होते, त्या कुमाराचा सहवास, साहचर्य आणि मार्गदर्शन लाभले. कोल्हापुरेंनी म्हटलं आहे, 'कुमारांच्यामुळे आणि आमचे महनीय गुरुजी प्रोफेसर बी. आर. देवधर यांच्यामुळं केवळ माझीच नव्हे तर कुमारांच्या निकट वर्तुळातील आम्हा सगळ्या संगीत-साधकांची नजर अधिक 'डोळस' झाली होती' वास्तविक हे प्रकरण आणि त्या पाठोपाठचे 'स्कूल ऑफ इंडियन म्यूझिक आणि कुमार' हे प्रकरण देवधरांच्या संगीत शाळेशीच संबंधित आहे. एकूण ५३ पानांच्या ह्या दोन प्रकरणात कुमार गंधर्वांच्या जडणघडणीची गाथा आहे. म्हणजे पुस्तकाची प्रस्तावना, कोल्हापुरेंचे निवेदन आणि संपादकांचे मनोगत या जवळजवळ चाळीस पानात कुमार ही काय चीज संगीत दुनियेतील आहे, याच्या मागील पार्श्वभूमीची कथा आहे - या कथा-गाथेने अर्धे पुस्तक जे व्यापले आहे, ते अतिशय अर्थवाही आणि समर्पक आहे.

'देवधर स्कूल' ही संस्था संगीताचा मूलगामी आणि सर्वंकष अभ्यास व विचार केलेल्या प्रो. बी. आर. देवधर यांनी स्थापलेली होती. त्यापूर्वीच्या, त्या काळाच्या आणि नंतरही अशी अभिजात पृथगात्मता असलेली संस्था झाली नाही. देवधरांनी अंत नसलेल्या संगीताला घराण्यांची बंदिस्त मर्यादा असलेल्या क्षेत्रातून बाहेर काढले आणि हा अनोखा प्रयोग सर्वांना मान्य होईल, असा नावलौकिक व दवदबा निर्माण केला. संगीताचे अर्वाचीन, प्राचीन आणि आधुनिक असे विविधांगी दालनांचे स्वागत, आकलन आणि जमेल तसे अनुसरण करण्याचा पायंडा घातला. कुमारांना याचा फार मोठा उद्‌बोधक लाभ जो झाला, तो या दोन प्रकरणात फार खुलेपणाने व रोचक रीतीने आला आहे. भविष्यात अजरामर ठरावे अशा सुरांची, रागांची आणि त्यांच्या पेशकारीची पीठिका जी कुमारांत समूर्त झाली, ती या संगीत शाळेत. हे सर्व कोल्हापुरेंनी दुर्मिळ अशा वस्तुनिष्ठेने अंकित केले आहे. देवधर स्कूलमध्ये ही माणसं काय शिकत होती, या पेक्षा काय काय शिकावे, काय काय घ्यावं आणि ते वाढवीत साठवावं, या प्रवोधनात दंग होत. हे देवधरांचं कसब होतं.

देवधरांच्या क्लासमध्ये कुमार एक तप होते. या बारा वर्षांत कुमारांच्या संगीतासंबंधाच्या वैचारिकतेची स्वरमय बांधणी झाली. 'देवधरजींनी १९३५ पासून बंदिशींचा संग्रह करण्यावर

खूप भर दिला. वेगवेगळ्या बुजुर्गांशी ते सतत संपर्क ठेवून असत. उस्ताद आणि पंडित मंडळींचा 'स्कूल'मध्ये नेहमी राबता असे. कुमारांना ह्या बुजुर्गांच्या प्रतिभाशाली भिन्न भिन्न संगीत निर्मिती आणि त्याचा वेहोष करणारा सुरेल आणि आविष्कार अनुभवावयास मिळाला. देवधर प्रत्येक गायनशैलीतील बलस्थाने आणि मर्मस्थाने समजावून घेत. कुणालाही अंधानुकरणापासून परावृत्त करीत. कालिदास मोहोळकरांच्या भाषेत 'गुरुजींनी संगीताकडे पाहण्याची अचूक दृष्टी दिली'.याचा परिणाम स्वतंत्रपणे बंदिशी बांधण्यात झाला. 'देवधर गुरुजींचा बंदिशींवर फार कटाक्ष असे. कुमारजींच्या स्वतःच्या गायकीत बंदिश या घटकाला जे असाधारण महत्त्व होतं, त्याचं मूळ आमच्या गुरुजींच्या या खासियतीत आहे' हे जे कोल्हापुरेंनी म्हटलं आहे, ते अतिशय समर्पक आहे. कुमार जरी स्वतंत्रपणे बंदिशी करत होते, तरी ते पारंपरिक बंदिशी निरनिराळ्या शैलीच्या आणि घराण्यांच्या बेमालूमपणे कंठस्थ नुसत्या केल्या नव्हत्या, तर प्रसंगानुरूप औचित्याने सादरही करीत आणि श्रोत्यांना चकित करीत. कुमारांना त्या त्या बंदिशी, विशेष चांगल्या अवगत होत्या. गुरुंकडून डोळसपणे विद्या घेऊन तिच्यात अभिजात भर घालून तिला उच्च पातळीवर त्यांनी नेले,असे देवधरांच्या कोणत्याच शिष्याने साधले नाही, हे जरी खरे असले तरी त्यात देवधर आणि त्यांच्या स्कूलचा वाटा मुळीच नाकारता येत नाही. याकरताच कोल्हापुरे या अनुषंगाने बऱ्याच वेळा आपण कुमारांवर लिहीत असताना देवधरांच्यावर आवर्तने करत आहेत, असे भासमान होण्याची शक्यता जाणवते. हा या पुस्तकाचा गुणही आहे आणि म्हटला तर दोषही आहे.

भानुमती आणि कुमार हा कुमारांच्या जीवनातला एक दैवी योग जो होता, तो मोठा रोमहर्षक आहे. एक सुविद्य तरुणी त्यांच्याकडे आकृष्ट होते आणि प्राणपणाने त्यांना सर्व अर्थाने जपते, वाचवते आणि जगवते हे सहजीवनातले एक दिव्य आहे. संगत, संवाद, सूर व सहप्रवास यात सेवा, कष्ट आणि तन-मन-धन वेचण्याची वृत्ती-कृती ही अलौकिकच म्हटली पाहिजे. कुमारांची ही शक्ती आणि प्रेरणा होती, ती भरल्या ताटावरून कायमची अंतर्धान पावली ही एक दारुण शोकात्मिका होय. कोल्हापुरेंच्या या प्रकरणात याचे विवरण आहे ते इतर तपशीलांसह. त्यात भानुमतीवरच भर देऊन अधिक लिहावयास हवे असं वाटल्याशिवाय राहवत नाही. अर्थात कोल्हापुरेंनी शेवटी, 'या देवानं आपल्या अतुलनीय पतीला अखेरपर्यंत जी सक्रिय साथ दिली आणि मार्गदर्शक साथ दिली, त्याला तुलना नाही' असे जे म्हटले आहे, तेही नसे थोडके.

हे प्रकरण वाचल्यावर माझ्या असं लक्षात आलं, की भानुमती आणि कुमारांवर जसं अधिक्यानं बोललं आणि लिहिलं गेलं, तितकं आणि तेवढ्या प्रमाणात वसुंधरेवर जरी लिहिलं गेलं नाही तरी तिच्यावर अन्याय व्हावा असं अल्पाक्षरी मौन हे बरोबर नाही. कुमारांना भानुमतीनंतर सावरण्यात अणि सहजीवनी साथ देण्यात वसुंधरा कमी पडली नाही. एक घर आणि संसार, पतिदेव आणि सूर यांचा संवाद राहावा, म्हणून तिचे अस्तित्व व सहकार्य मुळीच नगण्य नाही.

या पुस्तकातील नवसर्जन आणि कुमारांची विक्रमी आगेकूच आणि देशभर विशेषत: उत्तरेत त्यांनी 'गेले आणि जिंकले' असे जे संगीताचे मैफिलीकरण झाले, ते अतिशय बोलके आहे. तथापि या गोष्टी बऱ्याच अंशी संगीत शौकिन आणि रसिकांना माहीत आहेत. कोल्हापुरे वर्णने खूप देतात आणि विस्तारात नेमके बोट कशावर ठेवले ते तेवढे तीव्र राहत नाही. तरी पण कुमार आजारातून उठल्यावर एक प्रसंग कोल्हापुरेंनी अतिशय हृदयस्पर्शी केला आहे. पुण्यातल्या एका मैफिलीत गायकांची हजेरी लागली. चांगले गायले. कै. राम मराठे होते. शेवटी कुमारजींना आग्रह सुरू झाला, तेव्हा कुमार म्हणाले, 'अरे, आपण सर्व मस्त गायलात. परंतु वसंता, यार, मला गाण्याची परवानगी नाही.' तसे श्री. राम मराठे उठून जवळ आले आणि हात जोडून कुमारांना म्हणाले, 'मी फक्त आपल्या दर्शनासाठी आलो आहे, आपण जर एकच बंदिश ऐकवाल तर...' 'असं म्हणतोस, फिर जमाओ मेरा सुर' असं म्हणून कुमारजींनी रामभाऊंच्या हातात तानपुरा दिले. रामभाऊ म्हणाले, 'कुमार कुठली पट्टी?' त्याचं उत्तर - 'अरे, तुझीच पट्टी - सफेद चार' तानपुरे लागले. मी पाठीमागे बसलो अणि कुमार बोलले 'स्वरीलाव पंढरी' तबला नवाज श्री. लालजी गोखले, समोरून उठून तबला जमवू लागले. खाँ मेहबूब खाँ समोर येऊन बसले आणि डोळ्यातलं पाणी धोतरानं टिपत बोलले, 'किती वर्षांनी गातोय माझा राजा !' सर्व शांत बसले. कुमारांचा हुंकार सुरू झाला. कुमारांचे गाणे रंगत चालले. 'मारु जी भुला न म्हाने हा सोहनी भटियार या पारंपारिक जोड रागातल्या स्वरचित बंदिशीचा मुखडा घेऊन कुमार समेवर आले आणि मेहबूब खाँ हात आपटून कुमाराकडे पाहू लागले. इकडे लालजींच्या हातातून ठेका बंद झाला, 'बाबा, कुमार बाबा म्हणत लालजी रडू लागले. तसे स्थितप्रज्ञ कुमार त्यांच्या पाठीवर हात ठेवून म्हणाले, 'ठेका चालू रखो यार!' आणि कुमारांनी दोन वेळा ती बंदिश म्हणून अशी काही मुश्किल करून ठेवली की, काय म्हणावं या हुकमतीला ! हा कुमाराचा नवसर्जनाचा पहिला चमत्कार होता. असे आणखीन काही प्रसंग कोल्हापुरेंनी खुलवले, रंगवले आहेत. ते मुळात वाचल्यावरच त्यांची खुमारी कळते.

या पुस्तकात 'परिक्रमा' आणि परिशिष्टे आहेत. तीही वाचनीय आहेत. पण पुस्तकाचा उत्कर्ष उत्तर दिग्विजयात आहे. कुमारांची पत्रे फार महत्त्वाची आहेत. त्यात कुमारांची अद्वितीय आर्द्रता प्रत्ययास येते. कुमारांना आलेली काही पत्रेही यात लक्षणीय आहेत. पुस्तकाच्या सौंदर्यात भर घालणारी अशी छायाचित्रे या पुस्तकाला आणखीन देखणे करीत आहेत. या पुस्तकात एक मात्र जाणवले, की आजपर्यंत देवधर आणि त्यांच्या स्कूलवर विशेष विस्ताराने लिहिलं गेलं नाही, हेही खरं आहे. त्याकरता कोल्हापुरेंनी वेगळे विस्ताराने लिहावे. या पुस्तकामुळे ते त्यावर फार चांगले लिहितील असे मला नक्की वाटते. संगोरामांनी रसभंग होऊ नये व वास्तविकता यथार्थ व्हावी, म्हणून ते येऊ दिले हे कळण्यासारखे आहे. पुस्तकावर संपादनाचा प्रभाव व छाप हे लपून राहात नाही आणि ते मुळीच खटकत नाही. उलट योग्य तेच झाले असे वाटते. एवढेच नाही तर त्याला तोड नाही, असे वाटल्याशिवाय राहत नाही.

# वाचकांची जाणीव समृद्ध करणारा समीक्षासंग्रह



डॉ. मृणालिनी शहा

'कथा' हा एक लोकप्रिय वाङ्मय प्रकार आहे. मराठी कथेला समृद्ध परंपरा आहे. स्वातंत्र्योत्तर काळात मराठी वाङ्मयात निर्माण झालेला नवकथा हा एक सशक्त कथाप्रकार आहे. त्याबरोबरच ग्रामीण, दलित प्रवाहात कथेला मोठे स्थान आहे, असे दिसते. डॉ. पंडित टापरे यांच्या 'कथा : रूप आणि आस्वाद' या ग्रंथातील समीक्षा वाचताना याची प्रचिती येते. 'नवकथा', 'ग्रामीण कथा', 'दलित कथा' किंवा एकूणच कथा हा टापरे यांच्या आवडीचा आणि अभ्यासाचा विषय असल्याने त्यांनी कथेला दिलेल्या उत्स्फूर्त प्रतिसादाला चिंतनाची जोड मिळाली आहे. त्यांनी मराठी कथेसंबंधाने प्रसंगोप्रसंगी लिहिलेल्या समीक्षालेखांमागे, साहित्याच्या नवतेचा शोध हे एक सूत्र आहे. एकेका कथेची समीक्षा, कथासंग्रहांची समीक्षा आणि ग्रामीण कथेच्या तंत्राची चिकित्सा करणारा लेख असे तीन विभाग या पुस्तकात आहेत.

एकेका सुट्या कथेची उपयोजित समीक्षा हा यातील महत्त्वाचा भाग आहे. मराठी कथावाङ्मयांतील काही कथा अशा आहेत, की ज्यांचा शोध पुन्हा पुन्हा घेतला जातो. १९४५ नंतरच्या महत्त्वाच्या सर्व प्रवाहांतील एकएक कथा उदा. नवसाहित्याचा प्रवाह ('विनचेहेऱ्याची संध्याकाळ'), संज्ञाप्रवाह ('हॅट घालणारी बाई'), अस्तित्ववादी प्रवाह ('प्रवासी'), दलित प्रवाह ('विद्रोह'), ग्रामीण प्रवाह ('मोट' आणि 'रुखवत') घेऊन तिची वैशिष्ट्ये डॉ. टापरे येथे विशद करतात. ही वैशिष्ट्ये सांगण्याच्या पद्धतीत विविधता आहे. दिलीप चित्रे यांचे वेगळेपण समजावून घेतल्याशिवाय त्यांच्या कथेचा आस्वाद परिपूर्णतेने घेता येत नाही, अशी टापरे यांची धारणा आहे. म्हणून 'तिडीक, तिरडी आणि अनंतकाळ' या कथेला सामोरे जाण्यापूर्वी चित्रे यांची वाङ्मयीन भूमिका ते वाचकांना समजावून देतात. या कथेतील सदाशिवाची मध्यमवर्गीय जाणीव, नेणिवेच्या पातळीवर पाऱ्यासारखा धावणारा आशय, शीर्षकातून सूचित होणारा कथेचा रूपसंबंध इत्यादी वैशिष्ट्ये टापरे सांगतात. या कथेतील संवेदनांची एकामागून एक उदाहरणे देऊन दिलीप चित्रे यांनी आपला अनुभव कसा साकार केला आहे, हे सांगून नवकथेच्या संदर्भातील या कथेचे महत्त्वही टापरे विशद करतात. म्हणजे 'गंगाधर गाडगीळांच्या कथेचा पुढचा टप्पा' असे या कथेचे वर्णन डॉ. टापरे करतात. त्यामुळे टापरे यांची कथासमीक्षा दिलीप चित्रे यांना न्याय देणारी होते, त्यांच्यातील कथाकाराचा शोध घेणारी होते.

साहित्याचा आस्वाद घेताना रसिकांना समान धर्मीय साहित्याची आठवण होते. त्यांच्या मनात तुलनात्मक विचारही जागृत होतात. यातूनच तौलनिक समीक्षा पद्धतीचा जन्म झाला आहे. टापरे 'बाजाराची वाट' या व्यंकटेश माडगूळकरांच्या कथेची तुलना ग. ल. ठोकळ











यांच्या 'नीट नाकासमोर जा !' या कथेशी करून दोन्ही कथांतील सखोल अनुभवाची ओळख करून देतात. या समीक्षा ग्रंथातील समीक्षा वाचत असताना टापरे यांच्या उपयोजित समीक्षापद्धतीचा आपल्याला परिचय होते. कथेतून व्यक्त होणारा अनुभव व त्याचे मर्म उलगडून दाखवताना त्यातील प्राक्कथा, संवेदनासमूह यांच्या उपयोजनेतील सौंदर्यही टापरे उलगडून दाखवतात. कथाशैलीचा त्यांनी घेतलेला शोध हा कथेइतकाच वाचनीय होतो.

त्यांनी केलेले प्राक्कथांचे विश्लेषण वाचताना त्यांच्या सूक्ष्म अवलोकनाची प्रचिती येते. कथाव्यूहातील वारीक वारीक गोष्टींकडे लक्ष देणे कसे आवश्यक असते, हेही आपल्या ध्यानात येते.

कथांप्रमाणे कथासंग्रहाची परीक्षणे हा यातील महत्त्वाचा भाग आहे. द. ता. भोसले यांची ग्रामीण कथा, केशव मेश्रामांची दलित कथा यांच्या वरोवरीने एस. डी. इनामदारांची संज्ञाप्रवाही कथा देखील यात समाविष्ट झालेली आहे. 'गावरंग', 'पाळत' या विनोदी कथासंग्रहांची दखल लेखकाने गांभीर्याने घेतली आहे. त्यामुळे येथे विनोदी कथेतील जीवनदर्शनही दिग्दर्शित झाले आहे. नागनाथ कोत्तापल्ले यांच्या कथासंग्रहाची आलोचना करीत असताना डॉ. टापरे 'कथा' या वाङ्मयप्रकाराच्या चिंतनाकडे जातात.

डॉ. टापरे यांच्या समीक्षेला एक व्यापक अर्थ प्राप्त होतो, तो त्यांच्या 'मराठी ग्रामीण लघुकथा : तंत्रविकास' या लेखाने. कथेच्या तंत्राचा व मंत्राचा विचार करीत असताना वाङ्मयनिर्मितीची प्रक्रियाही ते लक्षात घेतात. निर्मितिप्रक्रिया समजली, की साहित्याचे साहित्यत्वही आपोआपच लक्षात येते. हा त्यांच्या विचारांचा पाया उल्लेखनीय आहे. साहित्यिक हा जसा जीवनाचा शोध घेत असतो, तसाच समीक्षकही साहित्यातून जीवनाचाच शोध घेत असतो, हेच खरे.

म्हणूनच टापरे यांच्या पुस्तकाच्या वाचनाने आपली कथाविषयक जाणीव रुंद होते. समीक्षेचे खरे कार्य रसिकांना त्या ग्रंथाचा फक्त परिचय करून देणे हे नसते, तर त्या रसिकांना ग्रंथवाचनास प्रवृत्त करणे, हे असते. डॉ. टापरे यांनी हे कार्य सहजतेने केले आहे. यामध्ये कसलाही अभिनिवेश नाही. त्यामुळे ती ती कथाकृती वाचकांपर्यंत अलगद जाऊन पोहोचते आणि म्हणूनच यातली समीक्षा ही केवळ आस्वादक समीक्षा राहत नाही, तर वाचकांना काही एक दृष्टी देणारी समीक्षा ठरते.

☐

*कथा : रूप आणि आस्वाद, लेखक डॉ. पंडित टापरे, नीहारा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १०८, किंमत रु. ६०.*

☐

डॉ. मृणालिनी शहा, १. शीतल अपार्टमेंट्स्, ४६/४, एरंडवणा, पुणे ४.



अनुक्रमणिका




कोल्हापुरेंनी योग्य आणि समर्थ माणसाच्या हातात हे काम सोपवले व त्याकरता कृतज्ञता व्यक्त केली ती सुसंस्कृतपणाचे लक्षण आहे.

या पुस्तकाचे मुखपृष्ठ हे कुमारांच्या रंगीत चित्राचे आहे. त्याची माझ्यापुरती एक गंमत सांगण्यासारखी आहे. मी प्रथम पुस्तक हातात घेतल्यावर ते मला फारसे भावले नव्हते. मात्र पुस्तक वाचल्यावर त्या चित्राने माझी नजर खिळवून ठेवली. कारण रवि परांजपे यांच्या ज्या कल्पक कुंचल्यातून हे चित्र रंगतदार रीतीने सालंकृत झाले, ती कुमारांची छवी जणू पाहणाऱ्याशी सुख संवदा करत आहे असे भासले !

अशा ह्या बहुमोल व संग्राह्य पुस्तकाचे मूल्य १६० फारच अल्प वाटले. दोनशे पानावरचे वाचनीय अशा सरस मजकुराने विपुल संपन्न अशा रंगीत छायाचित्रां (आर्ट पेपरवरील) च्या पुस्तकाची किंमत जास्त असती तरी वाचकांनी ते आवडीने घेतले असते, असं मला वाटतं. राजहंस प्रकाशनाने ते सुबक व सुंदर छापले आहे. तेही धन्यवादास पात्र आहेत. हे पुस्तक म्हणजे मराठीचे एक लेणे आहे ! □

गानयोगी शिवपुत्र, लेखक : पंढरीनाथ कोल्हापुरे
संपादक : श्रीरंग संगोराम, पृष्ठे २०२, मूल्य : १६० राजहंस प्रकाशन, पुणे.

□

दा. गो. देशपांडे, २/६, प्रीतमनगर, कर्वेपथ, कोथरूड, पुणे २९.

---

*(पान ५६ वरून पुढे चालू)*

योगी अरविंदांनी, जे कृष्णमूर्तींनी बाईंच्या मनावर शांतीचा, स्थैर्याचा चंदनलेप चढवलेला आहे. बाईंनी त्यांनाही शब्दरूपामध्ये मांडायचा यशस्वी प्रयत्न केलेला आहे. किशोरवयीन मुलांवर संस्कार व्हावेत, त्यांच्या भरकटलेल्या मनाला दिशा मिळावी, म्हणून योगी अरविंदांचे चरित्र त्यांनी कादंबरी स्वरूपात मांडलेले आहे.

ज्योत्स्नाबाईंच्या सात-आठ पुस्तकांचा हा धावता आढावा घेतानाही जाणवते, ते असे की, ज्योत्स्नाबाई स्वयंप्रज्ञ आहेत. जुने ते सोने असा त्यांचा आग्रह नाही, पण जुने टाकून सारेच नव्याने शोधा, असा अतिरेकी हव्यास त्यांना नाही. जीवनावर त्यांचे नितान्त प्रेम आहे. आदर्शांवर प्रेम करत जगल्यास जीवन नितान्त सुंदर होते, असा त्यांचा अनुभव आहे. त्यांच्या लेखनात कुठेही आग्रहीपणा, एकारलेपणा जाणवत नाही. स्वत:च्याच भानात, नादात, पण आजूबाजूचे जग डोळसपणाने न्याहाळत जगण्यात त्यांना स्वारस्य आहे. परमेश्वर त्यांना आरोग्यपूर्ण पूर्णायुष्य देवो हीच सदिच्छा.

शेवटी एका विख्यात इंग्रजी कवीने म्हटल्याप्रमाणे ज्योत्स्नाबाईही मृत्यूला म्हणतील, 'Death, be not proud through some must have called thee mighty and dreadful; but thou art not so !"

□

कल्याणी हर्डीकर, अ/६ सागरनिवास, परांजपे संकुल कर्वेनगर, पुणे ५२.











# वर्धा जिल्ह्यातील लोकसाहित्य : चिकित्सक अभ्यास

*(क्षेत्रीय संशोधन)*



प्रा. डॉ. पुरुषोत्तम कालभूत

भारतीय लोकजीवन व लोकसंस्कृती यांच्या अभ्यासाचे साधन म्हणून लोकसाहित्याचे मोल विशेष आहे. जीवनस्पर्शी, जीवनाविष्कार घडविणारे लोकजीवनाचे ते महत्त्वपूर्ण अंग आहे. लोकजीवनात परंपरेने चालत आलेल्या रुढी, लोकसमजुती, आचार, विचार, धर्मविधी व लोकभ्रम इत्यादींचा समावेश लोकसाहित्यात होतो. शिवाय समाजशास्त्र, इतिहास, मानववंशशास्त्र व मानसशास्त्र इत्यादी शास्त्रांनाही त्याचा स्पर्श होतोच. ह्या दृष्टीने महाराष्ट्राच्या वर्धा जिल्ह्यातील लोकसाहित्य व लोकसंस्कृतीचे उपासक यांच्या लोककलेचा व लोकसाहित्याचा क्षेत्रीय अभ्यास या दृष्टीने हा प्रबंध महत्त्वाचा आहे.

देशाच्या राष्ट्रीय एकात्मतेसाठी लोकसाहित्य व लोककला जतन करण्याची आज गरज आहे. भारतीय संस्कृतीचे सातत्य टिकवून ठेवण्यामध्ये आणि लोकजागृती करण्यामध्ये लोककला आणि लोकसाहित्य ह्यांचे मोठे योगदान असून आज या कला व साहित्य काळाच्या ओघात गडप होत चाललेल्या आहेत. अशा वेळी राष्ट्रीय एकात्मता टिकवून ठेवण्यासाठी लोकांमध्ये दुवा साधणाऱ्या या लोकसाहित्याचा ठेवा जतन केला पाहिजे, ही भूमिका प्रबंध लेखनामागे आहे.

प्रस्तुत प्रबंधात लोकगीते, लोकभक्तिगीते, लोकनाट्य, उखाणे, म्हणी, लोकभ्रम व लोकसमजुती इत्यादींच्या आधारे समाजशास्त्रीय, सांस्कृतिक व वाङ्मयीन दृष्टिकोनातून चिकित्सक अभ्यास करण्याचा प्रयत्न केला आहे. प्रबंध लेखन करताना प्रा. म. शं. वावगावकर, मराठी विभाग, नागपूर विद्यापीठ यांचे मोलाचे मार्गदर्शन लाभले आहे.

वर्धा जिल्ह्यातील लोकसाहित्य हा अभ्यास पुढील ११ प्रकरणांतून केलेला आहे.

प्रकरण पहिले :

लोकसाहित्य उद्‌गम आणि विकास.

प्रकरण दुसरे : लोकसाहित्याचे स्वरूप,

लोकसाहित्य म्हणजे काय? स्वरूप व संकल्पना.

लोकसाहित्याच्या अभ्यासाचे महत्त्व व निर्मिती मागील प्रेरणा.

लोकसाहित्याच्या अभ्यासाचे झालेले प्रयत्न व त्याचे स्वरूप.

लोकसाहित्याच्या अभ्यासाचे विविध संप्रदाय.

भारतात आणि महाराष्ट्रात लोकसाहित्याचा झालेला अभ्यास.

प्रकरण तिसरे :

लोकसाहित्य आणि सामाजिक शास्त्र

लोकसाहित्य आणि समाजशास्त्र

लोकसाहित्य आणि मानववंशशास्त्र

लोकसाहित्य आणि इतिहास व पुरातत्त्वशास्त्र












*प्रा. डॉ. पुरुषोत्तम मारोतराव कालभूत*
*जन्म : १९ ऑक्टोबर १९६२,*
*जन्मस्थळ : धामकुंड (कारंजा) वर्धा*
*शिक्षण : एम. ए., एम. फिल., पीएच. डी. (मराठी), एम. ए. (समाजशास्त्र), एम. ए. (राज्यशास्त्र), एम. ए. (इतिहास), बी. एड. राष्ट्रभाषा रत्न.*
*पीएच. डी. प्रबंधाचा विषय :*
*'वर्धा जिल्ह्यातील लोकसाहित्य : एक अभ्यास'*
*व्यवसाय : मराठीचे प्राध्यापक :*
*१) यशवंत महाविद्यालय, वर्धा (१९८६ ते १९८८),*
*२) आनंद निकेतन महाविद्यालय, आनंदवन, वरोरा, जिल्हा चंद्रपूर. १९८८ पासून मराठीचे प्राध्यापक व राष्ट्रीय सेवा योजना कार्यक्रम अधिकारी म्हणून काम करीत आहेत.*

*वर्तमानपत्रे, नियतकालिके यातून दर्जेदार संशोधनात्मक विपुल लेखन, लोकसाहित्य परिषद व अन्य चर्चासत्रांतून शोधनिबंध सादर, आकाशवाणी अन्य सभा-संमेलनांत व्याख्याने. लोकसाहित्याचे व्यासंगी अभ्यासक व संशोधक, समाजाभिमुख चिंतनशील व्यक्तिमत्त्व, राष्ट्रीय सेवा योजनेच्या माध्यमातून अनेक विधायक कामे व शिबिरांचे आयोजन, महाविद्यालयीन स्तरापासून ते राष्ट्रीय स्तरापर्यंत.*

*प्रकाशित पुस्तके :*
*१) लोकनाट्य उद्गम आणि विकास, विजय प्रकाशन, नागपूर.*
*२) लोकसाहित्य स्वरूप आणि विवेचन, (प्रकाशनाच्या मार्गावर)*
*३) राष्ट्रीय सेवा योजना सत्य आणि वास्तव (प्रकाशनाच्या मार्गावर)*





अनुक्रमणिका

१) लोककथागीत म्हणजे काय? स्वरूप व परंपरा
२) लोकगीतांचे वर्गीकरण
अ) कौटुंविक सामाजिक कथागीते
व) पौराणिक कथागीते
क) भगतांची कथागीते
ड) शौर्यात्मक कथागीते/पोवाडे
इ) ओवी, इतर लोककथागीते
ई) लोककथागीतांचे विशेष व वाङ्मयीन, सांस्कृतिक, समाजशास्त्रीय मूल्यमापन.

प्रकरण सातवे : लोककथा
१) लोककथा उगम, विकास व निर्मिती
२) लोककथांचे वर्गीकरण (दैवतकथा, अद्‌भुतकथा आणि परीकथा-दंतकथा-नीतिकथा किंवा प्राणिकथा, वीरकथा, हास्यकथा, व्रतवैकल्याच्या कथा, वास्तवकथा, स्पष्टीकरणकथा, मालाकथा, लोकोत्पीकथा.)
३) लोककथा प्रेरणा स्वरूप, परंपरा व लोककथांचा अभ्यास
४) कथाविशेष व कल्पनाबंध - लोककथेचे घटक व विशेष
५) लोकजीवनात लोककथेचे स्थान व मूल्यमापन

प्रकरण आठवे : उखाणे
१) उखाणे स्वरूप परंपरा
२) उखाण्याचे वर्गीकरण
३) उखाण्याचे मूल्यमापन

प्रकरण नववे :
म्हणी, कूटकथा, वाक्संप्रदाय व लोकसमजुती
१) म्हणीची परंपरा व व्याख्या
२) म्हणींचे स्वरूप आणि प्रादेशिकता
३) उखाणा आणि म्हणी तुलना
४) म्हणींचे वर्गीकरण व महत्त्व

५) वाक्यसंप्रदाय अर्थ, वर्गीकरण
६) लोकसमजुती
७) कूटकथा व म्हणीवर आधारित कथा

प्रकरण दहावे : लोकनाट्य

लोकनाट्य उद्‌गम आणि विकास

१) लोकनाट्य म्हणजे काय? 'लोकनाट्य' शब्दाचा अर्थ
२) लोकनाट्याची विकास परंपरा व प्रयोजन
३) कळसूत्री बाहुल्यांचा खेळ, दशावतार तळित-गोंधळ-दंडेगान-गंगासागर-दंडार-तमाशा
४) लोकनाट्याचा मराठी नाटकावरील प्रभाव या पारंपरिक लोकनाट्यांच्या व्यवच्छेदक प्रेरणा, स्वरूप, लक्षणांसह, सर्वस्पर्शी शोध घेऊन, 'शास्त्रीय आणि अभिजात रंगभूमीचा मूलस्रोत लोकनाट्यातच आहे' हे सप्रमाण दर्शविले आहे.

प्रकरण अकरावे :

लोकसाहित्य आणि समाजजीवन

१) सामाजिक जीवन व संस्कृती
२) धार्मिक समजुती व उपासना
३) लोकसाहित्यातील स्त्रीजीवन
४) लोकसाहित्यातून घडणारे अलंकार दर्शन व वेशभूषा

वरील प्रकरणांच्या द्वारा वर्धा जिल्ह्यातील लोकसाहित्याचा सर्वांगीण व सर्वंकष क्षेत्रीय सूक्ष्म अभ्यास करण्याचा व त्याआधारे सामाजिक, सांस्कृतिक, लोककलात्मक आणि वाङ्मयीन अभ्यास करण्याचा प्रयत्न केला आहे.

□

प्रा. डॉ. पुरुषोत्तम मारोतराव कालभूत
आनंद निकेतन महाविद्यालय, आनंदवन,
वरोरा, जिल्हा चंद्रपूर (महाराष्ट्र राज्य)

---

## श्रद्धांजली

१ जानेवारी ते ३१ मार्च २००० या कालावधीत खालील मान्यवर व्यक्तींचे दु:खद निधन झाले.

मेनका, माहेर, जत्रा या लोकप्रिय मासिकांचे संपादक पु. वि. बेहेरे (२७ जानेवारी २०००)

कथा, कादंबरी, नाटक, दूरदर्शनमालिका, चित्रपट कथालेखक इत्यादी विविधांगी साहित्य निर्मिती करणारे वाचकप्रिय लेखक प्रा. प्रभाकर तामणे (७ मार्च २०००)

शिक्षणविषयक पुस्तकांचे प्रकाशक गो. के. जोगळेकर (१८ मार्च २०००)

वैविध्यपूर्ण पुस्तके प्रकाशित करून आपला ठसा उमटविणारे श्री विद्या प्रकाशनाचे मधुकाका कुलकर्णी (२२ मार्च २०००)

महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे माजी संपादक, पत्रकार आणि लेखक वि. स. वाळिंबे (२३ मार्च २०००)

गावगाडा, बनगरवाडी इत्यादी मराठीतील गाजलेल्या पुस्तकांचे इंग्रजी भाषांतर केलेले लेखक शांताराम द्वारकानाथ तथा राम देशमुख (२८ मार्च २०००)

म. सा. परिषदेचे पदाधिकारी, कार्यकारिणी सदस्य, विश्वस्त वरील व्यक्तींच्या कुटुंबियांच्या दु:खात सहभागी आहेत. ईश्वर मृतात्म्यांना शांती देवो. त्यांच्या स्मृतीस विनम्र अभिवादन.

संपादक

---



अनुक्रमणिका

# व्यक्तिस्वातंत्र्यासाठी लढा देणारी त्रयी : महर्षी ते गौरी



## नंदा सुर्वे

काळ हा परिवर्तनक्षम असतो. जुन्या कालबाह्य वाटणाऱ्या रूढीसंकेतांना, नीतिसंकेतांना बदलत्या, वर्तमान संदर्भातलं नवं परिमाण लावणाचे प्रयत्न नेहेमीच केले जातात. ही परिवर्तनाची प्रक्रिया खूप सावकाश होत असते. कारण प्रचलित पद्धती सगळ्यांनाच शिळ्या, कालबाह्य, महत्त्वशून्य वाटत नाहीत. अनेकांजवळ प्रगतीवादी दृष्टिकोन नसतात. शिवाय पूर्वतत्त्वांचा भंग करण्याची हिंमतही बहुतेकांजवळ नसते. नवा विचार, नवे दृष्टिकोन लौकर पचनी पडत नाहीत. त्यामुळे सुधारणांच्या कामांमध्ये अडथळे निर्माण होतात. कधी कधी तर आशादायक वातावरणही तयार होत नाही.

समाजमानसात असणारा हा जो ताठरपणा (Rigidity) आहे, त्यामुळे अनेक सुधारणावाद्यांच्या पुढे नेहेमीच एक आव्हान उभं राहत असतं. त्यांना अनेक प्रकारे झगडावं लागतं. समाजाचा असंतोष, विरोधात्मक फळ्या यांना तोंड द्यावं लागतं. एक प्रकारचं उत्साहभंग करणारं वातावरण तयार होतं. पण बरेचदा हे सुधारणावादी नेते चिवटपणे आशादायक भविष्यकाळाकडे पाहत असतात. विजिगिषु वृत्तीनं कामाचा नेट लावत राहतात. अंशत: यश दिसायला लागलं तरी त्यांना आपल्या उद्दिष्टांचं क्षितिज दिसायला लागतं आणि त्यातूनच त्यांच्या क्रांतिकारक कामाच्या पावलांचे ठसे उमटायला लागतात. या लोकांना यशाची मिणमिणती ज्योतही पुरते. ह्या आधारे ते कार्यरत राहतात. कधीकधी त्यांची झुंज एकाकी ठरते. ते अर्थातच न डगमगणारे असतात. या त्यांच्यातल्या निर्भयपणामुळे आणि कामातल्या अखंडितपणामुळे त्यांना असामान्यत्त्व प्राप्त होतं.

असं असामान्यत्वाचं बिरूद लागलेली एकाच घराण्यात जन्मलेली त्रयी म्हणजे, महर्षी अण्णासाहेब कर्वे, र. धों. कर्वे आणि गौरी देशपांडे. या तिन्ही माणसांनी काळाच्या हिशोबात आपल्या क्रांतिकारक विचारांनी समाजाला हलवलं, नवी दिशा देण्याचा सातत्यानं प्रयत्न केला. त्यांच्या प्रदीर्घ कार्यकर्तृत्वाचा आढावा घेणारं 'महर्षी ते गौरी' हे मंगला आठलेकरांचं नव्यानं आलेलं पुस्तकं. 'महर्षि ते गौरी' या शीर्षकाखाली कंसात 'स्त्री-स्वातंत्र्याची वाटचाल' असा मजकूर छापलेला आहे. तो या तिघांच्या कार्यप्रवासातल्या समान सूत्राची नोंद घेतो. या पुस्तकात लेखिकेने सरळ सरळ तीन भाग पाडलेले आहेत. त्यामुळे एकेकाच्या कार्यविश्वाचा समग्र पटच वाचकांच्या समोर उभा राहतो. त्यांच्या कामाचं स्वरूप, कार्यपद्धती, कार्याची गती, येणारे व्यत्यय, त्यातून त्यांचं उभं राहणं असे अनेक मुद्दे हाताळत लेखिकेनं ते ते व्यक्तिमत्त्व वाचकांपुढे ठसठशीतपणे उभं केलं आहे.

रुढी, परंपरांमध्ये दबलेल्या स्त्रीला स्वतंत्र व्यक्तिमत्त्व मिळावं, तिला मोकळा श्वास घेता










यावा, मोकळा विचार करता यावा यासाठी या त्रयीने आपापल्या काळात वंडखोर विचार रुजवण्याचे प्रयोग सुरू केले. बोलण्यातली, लेखनातली, कृतीतली निर्भयता हे या तिघांचे जमेचे गुण. या बळावरच त्यांनी एकाकी लढे दिले. धर्मशास्त्राचे महाभयंकर चटके स्त्रीला सोसावे लागतात. त्यातून मुक्तता करण्यासाठी आगरकर, कर्वे, ज्यो. फुले, न्या. रानडे. बाळशास्त्री जांभेकर आदींचा महत्त्वाचा वाटा होता. विधवांच्या मरणाहून भयंकर अशा जगण्याची जाहीर चर्चा बाळशास्त्री जांभेकरांनी आपल्या 'दर्पण' या वृत्तपत्रातून सुरू करून लोकांना सजग करण्याचा प्रयत्न केला. लेखिकेनं प्रस्तावनेमध्ये एका मुद्यांवर फार मार्मिक भाष्य केलं आहे. त्या म्हणतात, 'पाश्चात्य देशात स्त्रीनं स्वत:ची चळवळ स्वत: उभी केली. स्त्री-स्वातंत्र्य मागणारी, समतेचे हक्क मागणारी स्त्रीच होती आणि आपल्याकडे स्त्रीला कधी आवाजच फुटला नाही. ती अनिवार्यपणे अन्याय सोसत राहिली. म्हणून काही विचारी पुरुषांना हा लढा उभा करावा लागला.'

महर्षी धोंडो केशव कर्वे यांनी स्त्रीशिक्षण, स्त्रियांचा उद्धार हे आपलं जीवनध्येय मानलं. त्यांच्या पहिल्या पत्नीच्या निधनानंतर पुनर्विवाह करायचा तर एखाद्या कुमारिकेशी करणं त्यांना योग्य वाटत नव्हतं. समाजात विधवा स्त्रीची अवहेलना त्यांना दिसत होती. त्यामुळे अशा स्त्रीशी विवाह करण्याचा त्यांनी निर्धार केला. त्याचप्रमाणे त्यांनी आपले मित्र नरहरपंत जोशी यांच्या बहिणीशी - गोदूबाईशी पुनर्विवाह केला. यासाठी हे स्थळ खुद्द त्या मुलीच्या वडिलांनी सुचवलं. हे महर्षी कर्व्यांना आशादायक चिन्ह वाटलं. समाज हळूहळू अनुकूल होत जाईल, या प्रक्रियेची ही सुरुवात होती. वर्तमानपत्रात मात्र त्यांच्या या पुनर्विवाहावर कडाडून टीका झाली. तसंच त्यांच्या या धैर्याचं कौतुकही झालं. यावरून लोकमत पूर्णत: विरोधात नव्हतं. याचा अंदाज महर्षी कर्व्यांना बांधता आला. त्यामुळे त्यांचं मनोधैर्य उंचावलं. तरीही तत्त्वत: एखादी गोष्ट पटणं आणि ती अमलात आणणं यात फार मोठं अंतर असतं, याची प्रचितीही आली. आपल्या नातेवाईकांनी निषेध व्यक्त करावा, ही गोष्टी कर्व्यांच्या मनावर आघात करून गेली. मुरुड ग्रामस्थांनी त्यांना वाळीत टाकलं. हाही आघात त्यांना सोसावा लागला. विधवांचा पुनर्विवाह ही फार मोठी चळवळ सुरू करण्यासाठी कर्व्यांनी स्वत: ते कृतीत आणून दाखवलं. त्यायोगे ही प्रथा रूढ व्हावी अशी त्यांची भाबडी समजूत होती. प्रस्थापितांविरुद्धच्या या लढ्याला त्यांनी वेगळं वळण देण्याचं ठरवलं. स्त्रियांच्या स्वत:कडे बघण्याच्या दृष्टिकोनात केवळ शिक्षणानंच बदल होऊ शकेल, असं त्यांना वाटलं. त्याला कारणही तसंच घडलं. गोदूबाईंना विधवा स्त्रियांकडूनच मिळणारी हीन वागणूक त्यांना अस्वस्थ करून गेली. आपल्या वाट्याला ज्या यातना आल्या, त्या तिच्याही वाट्याला आल्या पाहिजेत, हा एक प्रकारचा विकृत दृष्टिकोन आणि अशा स्त्रियांनी दु:खद आयुष्य जगायचं असतं, अशी स्त्रियांचीच मनोधारणा होती. या नकारात्मक दृष्टिकोनातून स्त्रियांना बाहेर काढून त्यांना आत्मविकासाची, आत्मभानाची दिशा देणं आवश्यक आहे, असं कर्व्यांना वाटलं. शिक्षणातच हे सामर्थ्य आहे, असं लक्षात आल्याने ही मूलभूत गरज भागवण्यासाठी शिक्षणसंस्था स्थापन करण्याच्या दृष्टीनं



अनुक्रमणिका

हालचाल सुरू केली.

त्या काळात पं. रमाबाई विधवांसाठी 'शारदा सदन' नावाचा आश्रम चालवत होत्या. हा आदर्श डोळ्यांसमोर ठेवून आपणही विधवा, परित्यक्त स्त्रिया यांच्या शिक्षणासाठी काही सोय केली पाहिजे, असं त्यांना वाटलं. या प्रेरणेतून त्यांनी सदाशिव पेठेतल्या, पेरुगेटजवळच्या गोरे यांच्या वाड्यात आश्रमाला सुरुवात केली. मुलींची संख्या जसजशी वाढत गेली, तशी हिंगणे येथे महिलाश्रमाची स्थापना करण्यात आली. (सन १९००) विधवा मुलींचे आश्रमात पुनर्विवाह लावून दिले जातील, असं भय निर्माण झालं तर मुलींना आश्रमात पाठवलं जाणार नाही व त्यामुळे आपलं सगळं काम थांबेल, हे लक्षात घेऊन कर्व्यांनी विधवांच्या विवाहाचा आग्रह सोडून दिला. तरीही त्यांच्यावर 'दुहेरी भूमिका घेणारे' म्हणून क्रूर टीका करण्यात आली. पण ज्याला एका विधायक कामाला वाहून घ्यायचंय त्याला अशा टीकांकडे दुर्लक्ष करावं लागतं.

शिक्षणानं व्यक्ती स्वावलंबी बनते, हा विचार करून कर्व्यांनी विधवा शिक्षणाला प्राधान्य दिलं. शिक्षण घेतल्यानंतर पुनर्विवाहाचा निर्णय हवा तर तिनं घ्यावा असा त्यांचा हेतू होता. स्त्रीशिक्षणाबरोबरच केशवपनाची प्रथा मोडून काढण्यासाठीही आश्रमाची मदत झाली. त्याबद्दलही समाजाचा क्षोभ कर्व्यांना सहन करावा लागला. तरीही त्यांनी सुधारणेचे एकामागोमाग एक धक्के समाजाला दिले. लहान वयात वैधव्य आलेल्या मुलींना छळावाचून चांगलं आयुष्य जगायला मिळावं, छंद जोपासता यावा आणि मुख्य म्हणजे नवऱ्याच्या मागे जगून काय करायचंय या निराशावादी दृष्टिकोनातून त्यांनी बाहेर पडावं, असे कर्व्यांचे आश्रम-स्थापनेमागचे निर्मळ, भावस्पर्शी विचार होते.

आपण उभारलेल्या या कामात प्रतिगाम्यांकडून होणाऱ्या टीकेकडे ते दुर्लक्ष करत राहिले, म्हणून काम पुढे सरकत राहिलं. वैयक्तिक मानपानाचा विचार करणाराला समाजकार्य करता येत नाही. समाजासाठी मोठी असणारी माणसं आपल्या कुटुंबीयांना न्याय देण्यात नेहेमीच कमी पडतात. त्यांचा थोरला मुलगा रघुनाथ यांच्यावर अनेक खटले त्यांच्या सामाजिक कामासंदर्भात झाले. सगळा समाज या रधोंच्या विरोधात असायचा. पण कर्व्यांनी मुलाची बाजू कधीच लढवली नाही. धाकटा मुलगा शंकर आफ्रिकेत डॉक्टर होण्यासाठी गेला तो तिथेच स्थायिक झाला. बाया कर्वे (गोदूताई) या आपल्या मुलाला एकदा म्हणाल्या, 'अरे, इथे नसती का तुला डॉक्टरी करता आली?' यावर मुलानं उत्तर दिलं, 'कधी घर असं माहीतच नव्हतं आम्हाला. सदा आपली धर्मशाळा.' बाया कर्वेंच्याही काही तक्रारी होत्याच. जी माणसं समाजाची, देशाची असतात, ती कुटुंबीयांची नसतात, हे जगात सगळीकडे दिसतं.

महर्षी धोंडो केशव उर्फ अण्णासाहेब कर्व्यांच्या जीवनपटानंतर लेखिकेनं त्यांचा पुत्र रघुनाथ यांचा संघर्षपटच उभा केला आहे. हे वाचत असताना तो सगळा अस्वस्थ करणारा काळ डोळ्यांपुढे उभा राहतो आणि या सुधारणावाद्यांच्या एकाकी झुंजीला सलाम करावासा वाटतो.

रघुनाथ धोंडो कर्वे हे विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातलं विलक्षण बुद्धिप्रामाण्यवादी व्यक्तिमत्त्व.

त्यांनी उभ्या केलेल्या संतती-नियमनाच्या कामात त्यांना प्रचंड विरोधास सतत सामोरं जावं लागलं. या संदर्भात लेखिकेनं म्हटलंय, 'महर्षी कर्वे काय किंवा रधों काय स्त्रीच्या हिताचंच काम करणारे हे पितापुत्र. पण पित्याच्या वाट्याला सन्मान आले आणि पुत्राच्या वाट्याला अवहेलना!' खरं म्हणजे रधोंनीही निःस्वार्थ बुद्धीनं, समाजकल्याणाच्या हेतूनं फार मोठ काम केलं, पण त्यांना समाजाचा नकार पचवावा लागला.

रधोंचं लहानपणही हलाखीतच गेलं. या मुलाला काय हवं - नको हे बघायला कर्व्यांना वेळ नसे. रधोंची सतत आजारी असणारी आई त्यांच्या वयाच्या नवव्या वर्षीच निवर्तली. घरात रमावं असं प्रेम त्यांना मिळालं नाही. त्यामुळे त्यांचा स्वभाव एकलकोंडा झाला.

वडलांप्रमाणेच रधोंही गणिताचे अभ्यासक, प्राध्यापक. पण गणितात काही करण्यापेक्षा त्यांनी सामाजिक कामासाठी वेळ द्यायचं ठरवलं. १९२१ साली रधोंनी संतती-नियमनाचा सल्ला देण्याचं आणि साधनांची विक्री करण्याचं काम सुरू केलं. या कामाचा प्रचार करणाऱ्या विविध देशांतील समाजसुधारकांना वाळीत टाकलं जाणं सहन करावं लागलं आहे. अनेकांना शिक्षा भोगाव्या लागल्या आहेत. रूढीग्रस्त समाजाचा रधोंना राग होता. १९२७ च्या जुलै महिन्यात रधोंनी 'समाजस्वास्थ्य' हे मासिक सुरू केलं. लोकांची मन तयार करण्यासाठी अशा एखाद्या मासिकाची नितान्त गरज त्यांना वाटत होती. लेखाद्वारे प्रचाराला वेग येईल, असंही त्यांना वाटलं.

१९२८ साली त्यांच्या पत्नीला (मालतीबाई) रक्तक्षय झाला. तेव्हा रधोंनी त्यांच्यावर केलेल्या संतती-नियमनाच्या प्रयोगांचाच हा परिणाम आहे, असा आरोपही त्यांच्यावर करण्यात आला. लोकांचं हे अज्ञान त्यांना फार चिंताजनक वाटे, म्हणून त्यांनी 'समाजस्वास्थ्य' या मासिकातून ते दूर करण्याचा प्रयत्न केला. आपल्या समाजात लैंगिक संबंधांवर कधी खुलेपणानं चर्चा होत नाही. परंपरेनं चालत आलेली नीती-अनीतीची झापडं आपण लावून आहोत, असे धाडसी विचार रधों या मासिकातून मांडत. समाजानं निषिद्ध मानलेल्या विषयांवर ते यात आग्रहपूर्वक लिहीत.

रधों संतती-नियमनाच्या प्रसाराच्या निमित्तानं जे सांगत, ते ऐकून घेण्याच्या मनःस्थितीत तो समाज नव्हता आणि याही पुढे जाऊन रधोंनी लैंगिक स्वातंत्र्याचा पुरस्कार करणारे आपले पुरोगामी विचारही मांडले. 'समाजस्वास्थ्य' हे समाज सुधारणेच्या अशा प्रेरणा देणारं एक 'बोल्ड' मासिक झालं होतं. त्यामध्ये ते अश्लील वाटावीत अशी चित्रंही छापत. त्यांना एकदा असा साक्षात्कार झाला की सत्य हे पूर्ण नग्नच असलं पाहिजे. म्हणून त्यांनी नग्नतेचाही पुरस्कार केला. त्यासाठी त्यांनी परदेशातील काही दाखलेही दिले. रधोंनी हे मूलभूत हक्क मानले आणि खाण्यापिण्याच्या स्वातंत्र्याच्या आनंदाशी हे जोडून टाकलं. रधोंना एकूणच माणसाची गळचेपी, कोंडी, घुसमट मान्य नव्हती. म्हणूनच घटस्फोटितेला, विधवेला लैंगिक स्वातंत्र्य मिळावं असं आग्रही प्रतिपादन त्यांनी केलं. कारण समाजातील नीतिकल्पनांनी, धर्मकल्पनांनी स्त्रीला फार मोठं दुःख दिलेलं आहे. म्हणून स्त्री स्वतंत्र व्हावी असं रधोंना वाटे. रधों आपले विचार

तर्कशुद्ध पद्धतीनं मांडत. त्यामुळे विरोधकही निरुत्तर होत. म्हणून त्यांची सहमती होती असंही नव्हे. अर्थात रधोंचं काम ठामपणे चाललेलं होतंच.

स्त्रियांसाठी स्वतंत्र शाळा, स्वतंत्र मासिक यांची गरज काय? असेही प्रश्न रधोंनी उपस्थित केले. स्त्रियांना राखीव काही नको. त्यांना समान हक्काची जरुरी आहे, असे विचारही त्यांनी त्या काळात ठोकपणे मांडले.

रधों हे विलक्षण वुद्धिप्रामाण्यवादी असल्यामुळे त्यांनी समाजाची फिकीर केली नाही. स्वत:च्या प्रतिपानदावावत ते कायम आग्रही राहिले. त्यांच्या स्वभावात हेकेखोरपणा, तिरसटपणा होता. त्यांच्यातल्या विक्षिप्तपणाचं उदाहरण द्यायचं तर त्यांच्या पत्नीच्या मृत्यूचा प्रसंग सांगता येईल. अप्पा पेंडसे यांना हातगाडीवर - शववाहिनीवर रधोंच्या पत्नीचं प्रेत दिसलं; म्हणून ते थांबले. तेव्हा रधोंनी उत्तर दिलं, 'रात्रीच वारली. सकाळी प्रार्थनासमाजाची प्रेतवाहिनी आणली. त्यालाच म्हटलं, 'पाच रुपये देईन. ऊठ चल. करायचीत काय इतर माणसं? त्रास कशाला सकाळीच? लोक तरी काय करणार होते येऊन? जी गोष्ट आपल्याला करता येते ती करून टाकावी. वरं. तो गाडीवाला पुढे गेला. मी जातो.' विलक्षण थक्क करणारा हा प्रसंग आहे.

मूर्ख रूढी, परंपरांनी व्यापलेल्या धर्माचा आपण एक हिस्सा आहोत, यावद्दल त्यांना फार खेद वाटे. परंपरांचं नको इतकं ओझं वाहणाऱ्या या ताठर समाजात परिवर्तनाची प्रक्रिया सु होण्यावावत ते साशंक राहिले.

रधों नुसते समाजसुधारक नव्हते. ते विचारवंत होते. विचारवंत हा मनुष्यहिताचा वि॰ करतो.' रधोंच्या वाट्याला मात्र कायम निंदा, टीका आली. रधोंच्या जीवनपटावरचे वरेचस प्रहार या प्रकरणात आलेले आहेत. वादप्रतिवादांचेही दाखले यात मिळतात. समाजाला एकांडी झुंज देणाऱ्या रधोंचा लेखिकेनं अनेक कोनांमधून विचार मांडला आहे. या व्यक्तिमत्त्वाचं सर्वांगी विश्लेषण यात आले आहे.

चाकोरीवाह्य, काहीसं धाडसी लेखन करणाऱ्या म्हणून गौरी देशपांडे यांना सजग वाचक ओळखतात. दिनकर धोंडो कर्वे आणि इरावती कर्वे यांची ही कन्या. कर्वे घराण्यातल्या तिसऱ्या पिढीतली ही क्रांतिकारक महिला. साहित्याच्या माध्यमातून त्यांनी स्त्रियांच्या मुक्ततेचे विचार ठोसपणे मांडले. गौरी देशपांडेंच्या काळातलं समाजजीवन वरचसं वदललेलं. तरीही त्यांचे विचार समस्त समाजमनाला फारसे पेललेले नाहीत. स्त्री-पुरुष संवधांचा मुक्त आविष्कार त्यांनी आपल्या लेखणीतून व्यक्त केला.

गौरी देशपांडे यांनी वयाच्या अठराव्या वर्षी अविनाश देशपांडे यांच्याशी लग्न केलं. उम्मी आणि मिठू या दोन मुलींना जन्म दिला. आठ ते दहा वर्षांनंतर त्यांच्या लक्षात आलं, की आपलं आणि नवऱ्याचं म्हणणं तसं जुळत नाहीये. म्हणून त्यांनी घटस्फोट घेतला. मोठी मुलगी ऊर्मिला आईजवळ राहिली अन् धाकटी वडिलांवरोवर अमेरिकेला गेली. गौरी देशपांडे यांचा मधला काळ ओढाताणीचा गेला. पुढे त्यांना सुरिंदर भेटला आणि दोघांचा सहप्रवास



अनुक्रमणिका

सुरू झाला.

गौरी देशपांडे लेखनातून उच्चभ्रू वर्गाविषयीच बोलतात. ज्यांच्याजवळ पोटाच्या भुकेचा प्रश्न नाही, आत्मभानानिशी जे जगू पाहतात, त्यांचा विचार त्यांनी साहित्यनिर्मितीमध्ये केला आहे. त्यांच्या कथेतील स्त्रिया व्यक्ती म्हणून जगण्याची धडपड करतात. आपलं 'स्त्री' असणं त्या वेगळं धरत नाहीत.

गौरी देशपांडे यांच्या साहित्याचा परामर्श घेताना मंगला आठलेकर म्हणतात, 'स्त्री-पुरुषात प्रियकर-प्रेयसीचं नातं असतं, तोवर सगळं उत्कट असतं. पण हे नातं नवरा-वायकोमध्ये रूपांतरित झालं की सगळं संथ, रटाळ, कंटाळवाणं होतं. नावीन्याची ओढ पुरुषाला असते तशी स्त्रीलाही असते. आपल्याकडे हे मान्य नाही. स्वातंत्र्य दोघांना मिळावं असं रधोंना वाटतं. तशीच मागणी गौरी देशपांडे यांच्या साहित्यात दिसते. या दोघांच्या विचारातली काही साम्यस्थळं लेखातून मिळतात.

लग्न व्यवस्थेतला फोलपणा गौरी देशपांडे यांना जाणवला आहे. त्यांच्या 'राईट ऑन सिस्टर्स' मधला दाखला देताना मंगला आठलेकर म्हणतात, पत्नीला पोसण्याच्या वदल्यात नवरा तिच्या शरीरावर अनियंत्रित सत्ता गाजवत असतो. यामुळे स्त्रीच्या मनाची होणारी तडफड गौरी देशपांडे यांच्या इतर साहित्यकृतींमध्येही दिसते. त्यांची नायिका जाच आणि कोंडी यामुळे त्रस्त असते. त्यामुळे मनासारखं, स्वतंत्र आयुष्य ती जगू पाहते. पती-पत्नीची नाती कधी कधी अतिशय निरर्थक ठरूनही ती तोडायला माणसं तयार नसतात.

तरीही त्यांच्या कथामधील व्यक्तिरेखा आपापले आनंद घेताना दिसतात. विवाहवाह्य संवंध हे त्यांना गैर वाटत नाही. हा सगळा प्रकृतीचा, परिस्थितीचा भाग आहे, असं त्या मानतात.

आकर्षणामुळे घडून येणाऱ्या स्त्री-पुरुष संवंधांना 'स्वैराचार' हा शब्दप्रयोग गौरी देशपांडे यांना अजिवात मान्य नाही. त्यांच्या 'थांग' या कथेतील कालिंदी आपल्या नवऱ्याव्यक्तिरिक्त इयन आणि दिमित्री या पुरुषांशी संबंध ठेवते. त्यालाही स्वैराचार म्हणणं त्यांना मान्य नाही. कालिंदीला नवऱ्याकडून कसलंही सुख मिळालेलं नाही. ती प्रेमासाठी भुकेलेली आहे. माणसाला सुखी असण्याचा अधिकार आहे, असं जे रधों म्हणत, त्याच सुखाच्या शोधात गौरी देशपांडेंच्या नायिका जाताना दिसतात. समाजाचं दडपण झुगारून देऊन आपलं सुख शोधणं हा त्या आपला अधिकार समजतात आणि त्या जवावदारीचं भानही ठेवतात.

रधोंनी अशा संवंधाकडे 'विविधता' म्हणून पाहिलं आहे तर गौरी देशपांडेंनी 'गरज' म्हणून पाहिलं आहे. त्यांनी इतका महत्त्वाचा प्रश्न साहित्यातून उपस्थित केला असूनही, त्याची सार्वत्रिक नोंद गंभीरपणे झाली नाही. याचं कारण मंगला आठलेकर सांगतात, की गौरी देशपांडेंनी उभं केलेलं जग स्वप्नील वाटतं, वास्तवातलं वाटत नाही.

एकंदरीने, मंगला आठवलेकरांनी या तीन व्यक्तिरेखांचा विचारपट, कालपट वाचकांसमोर नेटकेपणानं, अभ्यासपूर्णतेनं आणि सखोल जाणिवेतून उभा केला आहे. समाजविन्मुख कार्य

करणं सोपं नव्हे. चिवट आणि मजबूत मनोधैर्य असल्याशिवाय कार्य उभं करता येणार नाही. या तिन्ही सशक्त व्यक्तिरेखांना एकत्रितपणे वाचण्याचा योग 'महर्षी ते गौरी' या पुस्तकाच्या माध्यमातून मंगला आठलेकरांनी आणला आहे.

स्वातंत्र्य हे मूल्य म्हणून त्या तिघांनी मानलं. प्रत्येकाची स्वातंत्र्याची कल्पना वेगळी होती. पण स्वातंत्र्याकडे त्यांनी मूलभूत गरज म्हणूनही पाहिलं. समाजात असे परिवर्तनवादी लागतातच. त्याशिवाय समाज पुढे कसा सरकणार?अनावश्यक परंपरांची चौकट थोडी मोडावी लागते. ते काम या तिघांनी केलं. त्यासाठी त्यांना समाजाशी आणि स्वत:शीही झगडा करावा लागला. त्यांची एकूण जीवनधारा या पुस्तकातून वाचकांसमोर येते. आजपर्यंत या तीनही व्यक्तींवर विपुल लेखन झालं असतानाही स्त्रीस्वातंत्र्याच्या कार्यावर प्रकाश टाकण्यात लेखिका मंगला आठवलेकर यशस्वी झाल्या आहेत.

□

*'महर्षी ते गौरी', ले. मंगला आठलेकर, प्रकाशक : राजहंस प्रकाशन, पुणे, पृष्ठे १६८*

□

नंदा सुर्वे
आनंद-रंग, २७/३ हिंगणे खुर्द, सिंहगड रस्ता, पुणे ४११ ०५१.

---

# काव्यानंद



संगीता बर्वे

सुरुवातीला काव्यविषयक भूमिका मांडत असताना
अशी असावी कविता, फिरून तशी नसावी कविता, म्हणून
सांगावया कोण तुम्ही कवीला आहात मोठे? पुसतो तुम्हाला

हा केशवसुती बाणा आठवला आणि पुढ्यात आलेल्या संग्रहातील प्रत्येक कवितासंग्रह आणि त्याचा त्याचा कवी आपापल्या व्यक्तिमत्त्वानुसार माझ्या मन:चक्षूंसमोर उभा ठाकला.

प्रत्येक कवी आपापल्या कुवतीनुसार स्वत:ची वाट स्वत:च निर्माण करीत असतो. त्या वाटेवर कधी तो चुकतो, फसतो तर क्वचित सातत्याने पुढे जात राहतो. काव्यपरीक्षण किंवा मुद्दामहून केलेल्या भलावणीचा उपयोग हा मर्यादित काळापुरता असतो. शेवटपर्यंत राहते ती फक्त अस्सल कविताच !

या ठिकाणी एकूण 'दहा-बारा' कवितासंग्रहांचा विचार करावा लागत असल्यामुळे आपोआपच शब्दमर्यादा आली आणि त्यामुळेच कदाचित प्रत्येक कवीच्या संपूर्ण संग्रहाला न्याय देता येईल की नाही, असे वाटू लागले. मात्र तराजू घेऊन न्याय देण्याचा परखडपणा करत बसण्यापेक्षा, संग्रहातील दोष किंवा चुका शोधत बसण्याचा प्रयास करण्यापेक्षा, त्यातील 'हार्द' शोधून ते वाचकांपर्यंत पोचवावे, असे वाटले. जेणेकरून रसिक वाचकही या संग्रहांपर्यंत पोचतील आणि कवितेचा आनंद घेतील. कारण कुठलाही कवी मग तो सामान्य प्रतीचा असो वा उच्च. काव्यप्रेम मनात जागत असल्याशिवाय कविता लिहिण्यास उद्युक्त होऊच शकत नाही आणि असंख्य कवी लिहिताहेत ही गोष्ट 'मराठी वाचवा, वाचवा' म्हणत आक्रोश करणाऱ्या महाराष्ट्रीय माणसासाठी नक्कीच प्रशंसनीय गोष्ट आहे, नाही का?

**तरलतेने टिपलेला स्नेहबंध**

'कालिंदी' हा अरुण शेवते यांचा सातवा कवितासंग्रह.

'कावळ्यांच्या कविता', 'तळघर' या त्यांच्या कवितासंग्रहांना राज्यपुरस्कार लाभले आहेत, तर 'राजघाट' हा कवितासंग्रह महाराष्ट्र साहित्य परिषद - राजकवी यशवंत पुरस्कार प्राप्त आहे.

कालिंदी ही पूर्वरंग आणि उत्तररंग असलेली सलगतेने साकारलेली एक मालिकाकविता आहे.

कालिंदी कसा असतो
आठवणीचा पूर्वरंग?
तू गेल्यावर कळले

येथून या मालिकाकवितेच्या पूर्वरंगाला सुरुवात होते.

कवी स्वत:चे गाव विसरून गेला आहे. पण ज्या शहरात कालिंदी आहे, ते त्याला विसरता येत नाही. रानोमाळ पाखरासारखा भटकत असताना आपण शहरात कसे आलो?

याचे त्याला नवल वाटते. परंतु शहर त्याला परके वाटते.

या शहरात माझे तसे काहीच नव्हते
तुझ्यामुळेच या शहराने सांगितले
नदीला पूर आला तरी पोहायचे असते
काठावर वाट पाहत आपल्यासाठी
कुणीतरी थांबलेले असते
इथे कुणीतरी म्हणजे कालिंदी.

कवी कालिंदीमय आहे. कालिंदी आहे या एकाच वास्तवावर त्याचे जगणे तोललेले आहे.

'तू उजेड दाखवशील त्या क्षणी पहाट पहायचे ठरवले आहे' असे स्वगत करीत पूर्वरंगाची समाप्ती होते आणि उत्तररंगाला सुरुवात होते. या ठिकाणी कवीला आठवणींचा पूर्वरंग कसा असतो हे कालिंदी गेल्यावर समजलेला आहे; तर उत्तररंग - कालिंदी अचानक भेटल्यावर कळला आहे.

कलिंदीच्या कविता आणि कवीच्या कविता दोघांच्याही कवितांना किनारा जवळचा वाटतो. आणि पाऊस येणार म्हटले की त्यांची पावले आपोआपच समुद्राकडे वळतात. कवितेच्या दु:खाला या किनाऱ्यावर माहेरघर भेटते, असा कवीचा विश्वास आहे.

उत्तररंगात अनेक मिताक्षरी कविता भेटतात. कवीच्या हळव्या, कोमल अंत:करणाने कालिंदीशी असलेले स्नेहबंध तरलतेने मिताक्षरत्व ठेवून मांडल्यामुळे नकळत एक प्रकारची संयमशीलता, शांतता अणि गूढता या मालिकाकवितेत जाणवते.

कालिंदी : अरुण शेवते, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई, मूल्य ४० रु. पृष्ठे ६४

□

**बहुविध रंगछटांचे मिश्रण**

अभिजात कवितांचे वाचन करणारी कवयित्री म्हणून मधुवंती सप्रे हे नाव काव्यप्रांतात परिचित आहे. 'गंधार', 'शेरी', 'हसरी कविता' यानंतर 'ऋतुमंजिरी' हा त्यांचा चौथा कवितासंग्रह त्यांनी वाचकांपुढे सादर केला आहे.

संग्रहाच्या नावावरून कवयित्रीची निसर्गाची ओढ प्रत्ययास येते. तिने अनुभवलेला निसर्ग कोकण प्रदेशाचा असल्यामुळे त्यात बहुविध रंगछटांचे मिश्रण आहे.

कवयित्री म्हणते, 'कवितेनं जगण्याचं बळ दिलं. जगणं सुंदर केलं, यात शंका नाही. कवितेचा न दिसणारा तलम धागा मी मुठीत घट्ट पकडला आहे - अगदी बालपणापासून.'

ही काव्यविषयक भूमिका त्यांना निर्मितीची प्रेरणा देते.

निसर्गविषयक आणि स्त्रीवादी अशा दोन प्रकारांत 'ऋतुमंजिरी' संग्रहातील कवितेची विभागणी करता येईल.

निसर्गविषयक कवितांमध्ये ठळकपणे जाणवते ते कवयित्रीचे सृष्टीतील नानाविध रंगांचे आकर्षण.

'रंग', 'गाणं', 'पाऊसपक्षी', 'रंग केशरी', 'हे मेघांनो', 'मनात माझ्या' या कवितांमधून हा रंगछंद प्रामुख्याने प्रत्ययाला येतो.

'निळ्या मखमली खुळ्या भावना'
'मोहवितो धुंद मना सांध्य रंग मेघांचा' किंवा
'हळदुल्या केळीच्या गाभ्यात लसलसणाऱ्या
कोंभांना मी रेशमीजांभळे रंग चढवले'

या ओळींमधून रंगरेषा आणि आतून

पाझरणारे संगीत यांचे काव्यात्म मीलन झालेले आढळते.

कुणी अचानक भेटावे मज
तार छेडिली जावी
नसानसातून लावण्याची
तान सुगंधित व्हावी
(कुणी अचानक)

यात कुणी अचानक म्हणजे कविताच भेटावी असे कवयित्रीला वाटत असावे.

स्त्रीवादी कवितांचा विचार करताना 'मंगळसूत्र', 'मातृत्व', 'जन्मदायिनी', 'जखम', 'भय' या कवितांचा समावेश होतो. महानगरातील गर्दीत सराईत होण्यापूर्वीचे, भांबावलेल्या मनाचे चित्रण 'भय', 'शोषण' या कवितांमधून मांडले आहे.

स्वयंपाक घरात राबताना
अंतिम सत्यापर्यंत पोचायची
माझी धडपड असते
(अंतिम सत्य)

असे ती थेटपणे व्यक्त करते.

मात्र निसर्ग, स्त्रीवादी कविता किंवा महानगरीय संवेदनेची कविता हाताळत असताना 'लावणी पावसाची' या कवितेत मात्र चक्क 'रेशमाच्या रेघांनी लाल काळ्या धाग्यांनी' या गीताच्या चालीवर 'हात नका लावू ओल्या साडीला' अशी संपूर्ण रचना लिहिते तेव्हा आश्चर्य वाटते.

ऋतुमंजिरी-कवयित्री मधुवंती सप्रे
संवेदना प्रकाशन, किंमत ४० रु., पृष्ठे ६०

□

### संवेदनाक्षम कविता

'धुवाधार गजवजलेल्या रस्त्याच्या मधोमध' हा कवी गणेश विसपुते यांचा कवितासंग्रह. शीर्षकापासून या कवितेतील वेगळेपणा लक्ष वेधून घेतो. प्रत्येक कवितेचे दीर्घ शीर्षक हे देखील या कवितेचे वैशिष्ट्य म्हणता येईल.

'अस्तित्वाच्या खणखणीत निशाणाशिवाय',
'विझण्याआधीच्या शेवटच्या चरणामधे'
'पहाटेच्या पहिल्या जाणिवेचा सायरन'

ही कवितांची शीर्षके उदाहरणादाखल पाहिली की, याची साक्ष पटते.

कवीच्या मनात सतत झंकारत राहिलेले विषय चिंतनशील रूप घेऊन आवेगाने उतरतात. तो आवेग थोपवता येत नसल्यामुळेही कदाचित भरभरून कवितेत उतरत असावा आणि त्यामुळे दीर्घ कविता आकाराला येत असावी.

कवी दि. पु. चित्रे यांनी या कवितेची 'पाठराखण' (ब्लर्ब) करताना कवीला लिहिलेल्या पत्रात म्हटले आहे,

'गाण्यात जसा एकेक पलटा गायकाचे व्यतिमत्त्वच उलगडतो, तशी कवितेची एकेक ओळ चपखल शब्दानुक्रमाने यावी लागते. ते तुझ्या कवितांमध्ये आहे. मुख्य म्हणजे पल्लेदार ओळी तुला सहज पेलतात आणि दाणेदार स्वरांप्रमाणे तुझी शब्दकळा 'ढाली' आहे.'

शब्दांचा हा दाणेदारपणा आणि शब्दांना असलेले वचन या कवितांमधून निश्चितरूपाने जाणवते.

'दोन प्रकाशलोळांच्या कर्कश्श दिवसांमधली ही रात्र'
'स्थिरावलेल्या सन्मित्र पक्ष्यासारखा वसंत'
किंवा
'माझ्या नाभितून सुरू होणारी दोरी

पार मागे भूतकाळाच्या पाताळात
पूर्वजांच्या पोटात अदृश्य होते.'

या व अशा ओळी वाचल्या की कवितेचा आवाका लक्षात येतो.

धुवांधार गजवजलेल्या रस्त्याच्या मधोमध उभी असताना 'तुमच्याशी नाहीच समकालीन माझी कविता' असे म्हणत कवीने घेतलेली पोझ त्याच्या संमिश्र व्यक्तिमत्त्वाची निदर्शक आहे.

कवितेविषयक बरेच काही हातचे राखून न ठेवता हा कवी दीर्घरूपाने मांडतो.

माफ कर राव, पण डार्विन
काय करू या मध्येच
वेळी अवेळी बाहेर पडणाऱ्या
माझ्या आतल्या माकडाचं?
(माफ कर डार्विन)

किंवा 'खूप कसोशीनं सांभाळल्या भिंती', 'हळू हळू सारेच आधार', 'भवेशचंद्र सान्याल' या आणि अशा कवितांमधून पाझरणारे चिंतन वाचकाचे कुतूहल वाढवतात.

त्यासाठी ही कविता समग्र आणि एकांतप्रिय होऊन अन्वयार्थ लावून वाचायला हवी म्हणजे त्यातील वेगळेपणा आणि त्या त्या कवितेत मांडलेला विचार यांचा एकसंध प्रभाव रसिक वाचकांवर पडल्याशिवाय राहणार नाही.

'धुवांधार गजबजलेल्या रस्त्याच्या मधोमध'

कवी गणेश विसपुते, अनन्य प्रकाशन, पुणे, किंमत ५० रु., पृष्ठे ११२

□

**भावगीतसदृश रचना**

'अंतर्नाद' हा कवयित्री रजनी हिरळीकर यांचा कवितासंग्रह.

संग्रहाच्या प्रारंभी मनोगतात कवयित्रीने स्वत:चेच म्हटल्याप्रमाणे अंत:करणातून सहजतेने शब्दरूप धारण करून आलेल्या विविध भावनांचा हा सहज आविष्कार आहे.

त्या म्हणतात,

'प्रतिमा आणि प्रतीके माझ्या कवितेला फारशी मानवत नाहीत. जेव्हा सहजतेने शब्द सामोरे येतात, तेव्हा कोणताही खटाटोप न करता कविता माझ्या समीप येते. बस्स ! इतकंच !'

असा हा सहजसुलभ प्रांजळ काव्यप्रवास आहे. 'अंतर्नाद'मध्ये अनेक विषय कवयित्रीने हाताळले आहेत. त्यात मदर तेरेसा, दत्तगुरू, किटी पार्टी अशा मुक्तछंद रचनेपासून

'घन् ओसंडून बघ आले' ते
'चला आला पाडवा गुढी उभारू घरोघरी
अशा भावगीतसदृश रचनाही आहेत.

कवयित्रीचा कल मुक्तछंदापेक्षा भावगीतसदृश रचनेकडे जास्त आहे.

'छाटा प्रकाश रेषा
मिसळून एक झाल्या
भगव्यात जीव माझा
एकांतप्रिय झाला'

(विराणी) अशी स्वत:शी एकरूप होऊ बघणारी कविता वाचकांशी एकरूप होते.

त्याचप्रमाणे

'मला वाटते खळखळणारी
अवखळ सरिता व्हावे
कडेकपारीमधुनी उसळत
जीवन उधळीत जावे '

(मला वाटते....)

अशा निर्भर ओळी वाचकाला आनंद देतात.

मात्र जितक्या सहजप्रेरणेनं या ओळी येतात, तितक्याच ढोवळपणाने

'जीवनाला बेधडक सामोरं जावं
आव्हानं बेलाशक स्वीकारावीत'
(रस्ते)

अशी गद्यप्रायता मुक्तछंदात जाणवते.

कवयित्री २३ वर्षे अध्यापनक्षेत्रात असल्यामुळे शिक्षणक्षेत्रातील विसंगती त्यांनी 'वर्ग आणि निर्झर' या कवितेत टिपली आहे.

बालकवींची निर्झर कविता मुलांना शिकवताना वर्गातील विद्यार्थ्यांची स्थिती

वर्गातल्या चिमण्या
दावणीला बांधलेल्या गुरांसारख्या
मूक... स्तब्ध
वर्गातल्या खोलीत शरीरानं बद्ध
झुळझुळणाऱ्या स्वच्छंदी झऱ्याचं गाणं
त्या कशा बरं ऐकणार?
(वर्ग आणि निर्झर)

आपल्या अनुभवातून आलेली ही व्यथा मांडून रूक्ष शिक्षणपद्धतीवर त्यांनी मार्मिक भाष्य केले आहे.

अंतर्नाद : रजनी हिरळीकर
भक्ती प्रकाशन, कोल्हापूर, पृष्ठे ६२,
किंमत ४० रुपये

□

**घुसमटीची कविता**

कवयित्री गौरी भोगले यांचा 'क्षितिज' नंतर तेरा वर्षांनी प्रसिद्ध झालेला 'अनाहत' हा दुसरा कवितासंग्रह.

'एका श्वासाचे अंतर', 'पानगळ' आणि 'अवशेष' अशा तीन भागात यांतील कविता विभागल्या आहेत.

अभिव्यक्तीसाठी कवितेने संपूर्ण मुक्तछंद स्वीकारला आहे. संग्रहाला प्रसिद्ध कवयित्री शिरीष पै यांची रसाळ प्रस्तावना लाभली आहे. प्रस्तावनेत शिरीष पै म्हणतात,

'गौरी भोगले यांची भावकविता सर्वसामान्यांच्या व्यवहारी जगाहून वेगळ्या अशा भावनेच्या जगात जगणारी, आपले कोमल भावविश्व आत खोल कुठे तरी जपून ठेवणारी आणि त्यातच खऱ्या अर्थाने जिवंत राहणारी आहे.'

याचे प्रत्यंतर ही कविता वाचत असताना वाचकाला येते.

पूर्वायुष्यातील धूसर होत गेलेल्या संदर्भांचा ही कविता वेध घेऊ पाहते.

'हे प्रभू,
जर तू खरोखरच असशील
तर फक्त मला सामर्थ्य दे
स्वत:शीच लढण्याचे.'
(अंधारात)

असे मागणे करीत कवयित्री जगण्याचा आधार कवितेतून शोधू पाहते. आयुष्याचा नवा अर्थ लावू बघते. त्यामुळे कोसळणं आणि घडणं या दोन बिंदूंभोवती ही कविता फिरत राहते.

'आयुष्य जर धोकाच देणार असेल
तर कशाला हवी शब्दांची भलावण
आणि भावनांची थरथर
(पानगळ)

अशा विचारांभोवती मन फिरत राहिल्याने कवयित्रीच्याही नकळत कवितेचे काही वेळा अल्पाक्षरत्व आणि मितभाषीपणा येत असावा.

यामुळेच की काय कवितेतून त्यांचे व्यक्तिमत्त्वही धूसरपणे प्रगट होत राहते. कवयित्रीच्या मनाचा आणि कवितेचा दिलखुलास अंदाज घेता येत नाही.

'या अशा कातरवेळी खोल डोहातून आल्यासारखे वाटणारे आर्त हुंकार माझेच तर नव्हेत?' हा कवयित्रीला स्वत:लाच प्रश्न पडतो.

हे आर्त हुंकार माझेच आहेत, असे ठामपणे ती सांगू शकत नाही आणि 'घनगर्द काळोखातले हे जीवघेणे हल्ले मी परतवून लावतेय अगतिकपणे जिवाच्या आकांताने' असे म्हणत असताना पुन्हा एकदा 'कशाला हवी भावनांची थरथर?' या उपस्थित केलेल्या प्रश्नाचे उत्तर कवयित्रीला सापडले तर ही कविता घुसमटीतून अधिक मोकळी होईल, असा विश्वास वाटतो.

'असे का आडून आडून
छुपे वार करतोस
युद्धाला मी तयार आहे
हरवून दाखवतोस?' (पानगळ)

हा आत्मविश्वास अधिक सामर्थ्यवान होवो. या सदिच्छेसहित पुढील काव्यप्रवासात शुभचिंतन.

'अनाहत' : कवयित्री गौरी भोगले
उत्कर्ष प्रकाशन, पुणे, पृष्ठे ६४,
मूल्य ७० रुपये.

□

**उद्ध्वस्त मनाचे आत्मनिवेदन**

'आत्मघाताच्या कैफ वाटेवर' हा चैतन्य माने यांचा पहिला कवितासंग्रह.

हिमोफेलियासारख्या दुर्धर आजाराशी आयुष्यभर सामना करताना कवीला मधूनच येणारे वैफल्य, त्यातून स्वत:ला सावरण्यासाठी स्वत:च निर्माण केलेली उमेद आणि 'आत्मघाताच्या कैफ वाटेवर' असताना उद्ध्वस्त मनाचे कवितेने धरलेले बोट असा हा प्रवास आहे.

आयुष्य अंधारमयी वाटत असताना कवीला पुस्तकांचे स्वयंप्रकाशी जग सापडले आणि कोसळून जाऊ की काय? अशा निकराच्या क्षणी कविता सामोरी आल्यामुळे निर्माण झालेली जगण्याची उमेद या संग्रहात मुख्यत्वे करून जाणवते. मनात सारखा काळोख साचत असताना सूर्य उगवावा, त्याप्रमाणे ही कविता त्या काळोखातून उगवत आहे, असे वाटते.

'बाहेर अंधार पडत असताना
मी आत अगदी कावराबावरा होतो
तुझे अचानक हास्य
आणि तुझ्या डोळ्यातील कवितेचा प्रकाश.
ता माझा दिवस सुरू झालेला असतो.'
(माझा दिवस)

अशी ही आत्मनिवेदनात्मक कविता आहे. प्रिय व्यक्तीला मनात ठेवून तिच्याशी केलेला संवाद आणि स्वत:च्या मनाशी केलेला संवाद असे स्वगतपर स्वरूप या कवितेत आहे.

'आत्मघाताच्या कैफ वाटेवर' या शीर्षकातून वाचकाच्या मनात संमिश्र कुतूहल निर्माण होते. त्याचे स्पष्टीकरण करताना कवी म्हणतो,

'पुन: पुन्हा उमेदीने काही करू पाहणे आणि उद्ध्वस्तून स्वत:शी परत येणे, या ससेहोलपटीत कवितेचे सारे अट्टाहास निर्जिवले आहेत. एक निमूट सर्व स्वीकारशील भान घेऊन या विपर्यासात ती आता उभी आहे.

जगण्याचा हा निरर्थक पेच केवळ माणूस म्हणून अंगावर घेताना तिला तीव्र आत्मभानाचा देठ आणि वाट्याला येणारे सारे केवळ 'आहे' या संज्ञेने स्वीकारणारे शरणलीन डोळे लाभले आहेत.'

कवीचे प्रदीर्घ आजारपण त्याच्या तळाशी असलेली सर्व उर्जस्वलवृत्ती एका अनाम ओढीने बाहेर खेचते आहे आणि त्याचे फलित, त्याला उमेद देणारी ही कविता आहे.

'स्वप्नातील उन्हे', 'उजाड लसलसल्या मरणबागेत', 'अनाकलनीय पाऊस', 'किती बोलत राहतो आपण स्वत:शी' या आणि अशा वेगळेपणाचे शीर्षक घेऊन आलेल्या कविता वाचकाला अंतर्मुख करतात.

स्वत:च्या वाटेवर ही कविता अनावर होऊन उमलते आहे. या कवित्वाला आणि कवीला आम्हा सर्व रसिक वाचकांच्या अंत:करणपूर्वक शुभेच्छा !

आतमघाताच्या कैफ वाटेवर: चैतन्य माने
कोजागरी प्रकाशन, मूल्य ४० रुपये, पृष्ठे ५५

□

### क्रांतीची कविता

'युद्ध सुरू आहे' हा शशिकांत हिंगोणेकर या कवीचा संग्रह. नावावरूनच कवीच्या मनात पेटलेल्या क्रांतीची ही कविता आपल्या पाऊलखुणा वाचकांच्या मनावर ठेवून जाते.

एकूणच दलित कवितेतील आत्मशोधाच्या संदर्भात विवेचन करणारी गंगाधर पानतावणे यांची गुणग्राही प्रस्तावना या संग्रहाला लाभली आहे.

दलित कवितेचे मराठी साहित्यातील योगदान मोठे आहे.

प्रस्तावनेत पानतावणे म्हणतात, त्याप्रमाणे 'दलित कविता ही पीडेची कविता आहे. पीडक आणि पीडित, शोषक आणि शोषित, 'आहेरे रे' आणि 'नाही रे' यांच्या अंत:संघर्षातून जन्माला आलेली ही कविता प्रारंभी मुठी उगारत असली तरी हे हात सृजनाचेच असतात.'

हिंगोणेकरांची कविताही अशीच सर्जनशील आहे.

'माझा उजेड' या कवितेत कवी म्हणतो,

'माझा उजेड
ज्या कैदखान्यात कोंडलाय
ते कैदखाने उद्ध्वस्त करायचेत मला.'

स्वत:ची घुसमट थांबवून मोकळा श्वास घेण्याची तीव्र आर्तता या संपूर्ण संग्रहात भरून राहिलेली जाणवते.

धगधगणारे निखारे आत पेटलेले असताना जळत जाणाऱ्या वेदनेची धग या शब्दांना आहे. 'माझ्या ओंजळीत' या कवितेत कवी म्हणतो,

'माझ्या ओंजळीत
ज्वाला फुलं आहेत
त्यांचा गजरा करून
तू वेणीत माळ
म्हणजे उजेडाचे प्रदेश
कवेत येतील'
(माझ्या ओंजळीत)

उजेडाचा कवडसा प्राप्त करण्याच्या धडपडीतून आकार घेणारी ही कविता युद्धाची भाषा बोलत असली तरी ती आक्रस्ताळी नाही. फारशी आक्रमकही नाही. तिला एक संयत सहनशीलतेची किनार आहे. आव्हान पेलण्याची क्षमता तिच्यामध्ये आहे.

मी मस्त

काळाचा हात आत घेतो
आणि प्रकाशाचे गाणे गातो

असे म्हणत उजेडाची वाट स्वत:च्या हातांनीच निर्माण करायची असते, याची लख्ख समज या कवितेला आहे. तिला वर्तमानाचे अचूक भान आहे आणि भविष्याबद्दल अदम्य विश्वासही आहे.

दलित कवींच्या तिसऱ्या पिढीतील एक आशादायक कवी असे प्रा. रा. ग. जाधव यांनी या संग्रहात शशिकांत हिंगोणेकर यांच्याबद्दल विश्वास व्यक्त केला आहे.

युद्ध सुरू आहे, कवी : शशिकांत हिंगोणेकर, अस्मिता प्रकाशन, औरंगाबाद. पृष्ठे ११२

□

**वेदनेच्या जन्माची कविता**

'आकाश पेलताना' हा ज्ञानेश्वर कोळी या कवीचा तिसरा कवितासंग्रह.

यापूर्वी 'जगणे माझे' आणि 'आयुष्याच्या वाटेवर' हे दोन संग्रह त्यांच्या नावावर आहेत. सांगली जिल्ह्यातील अंकलखोप या गावी राहून आपल्या कवितेत ग्रामीणबाज सांभाळणारा हा कवी ऊस तोडणी कामगारांच्या व्यथेपासून परिसरातील निसर्गही आपल्या कवितेत अंत:स्फूर्तीने मांडतो.

'तोड ऊसाची संपली
गुरं टरकात कोंवली
रोजगार बघायला
वैलं उपाशी चालली.'
(आम्ही निघालो गावाला)

असं उभ्या वागण्याचं जगणं जगणाऱ्या लमाणांचं दु:ख कवीला जगण्याचं शहाणपण देतं.

उन्हाच्या चिंध्या, वेवारशी दिवस, पोटातले तराणे, गव्हाचं मातेरं असे काही चपखल शब्दप्रयोग कवितेतील कारुण्याची किनार अधोरेखित करतात.

आईनं स्वत:च्या पोटाला चिमटा घेऊन मुलांसाठी खस्ता खाल्लेल्या असतात. आपल्या कच्च्या-बच्च्यांसाठी आईचं नाजूक आतडं नेहेमीच तुटतं. ती रानात जाते. लेकरांसाठी रानातून करडीची भाजी घेऊन येते आणि उपाशी पोरांना आपल्या वाटणीचा घास देते, हे सांगताना कवी म्हणतो,

'खळाखळा भाजी धुवून
रटारटा शिजवायची
नऊग्रहांचे नऊ गोळे
धरतीसकट वाटायची'
(आकाशात झेप)

इथे आईच धरती होऊन जाते आणि आपल्या मुलांना वात्सल्यानं भरवते.

'आईविषयीची कृतज्ञता व्यक्त करताना
लाखमोलाचा जन्म तूच दिला
तळहाताचा फोड जीवापाड जपला'
(आई)

असे लिहिताना जगण्याच्या आविर्भावात तिला विसरून गेल्याची खंत कवीला वाटते.

ही सारी कविता वेदनेच्या जन्माची आहे. आघात सोसूनही पुढच्या प्रवासाची आहे.

'वाट पाहून ढगांची
गेले खडकाला तडे
आणि उजाड रानात
कैक पडले सांगाडे'
(कधी येणार पाऊस)

अशी हुलकावणी देणाऱ्या पावसाची कविता तिच्या थेटपणामुळे मनाला भिडते.







आपल्या मातीचा, शिवाराचा प्रामाणिक अभिमान, गरिबीची दाहकता आणि उच्चवर्णीयांविषयी सुप्त चीड या समग्र कवितेमधून प्रभावीपणे जाणवते.

मराठी कवितेला थोडेबहुत अपरिचित असलेले जग या कवितांमधून आकाराला येते आहे, हे या कवितेचे वेगळेपण म्हणून सांगता येईल.

आकाश पेलताना, कवी : ज्ञानेश्वर कोळी
वारणा कामगार प्रकाशन, वारणानगर,
मूल्य : ४५ रु., पृष्ठे ६०

□

**काव्यप्रेमातून जन्मलेली 'आत्मजा'**

'आत्मजा' हा मृणालिनी प्रभू या कवयित्रीचा संग्रह.

मनोगत मांडताना कवयित्री म्हणते, 'सध्याच्या विपुल कवितेबद्दल आणि कवींबद्दल काहीजण खूप चिंतातुर होतात आणि काही वेळा आपलं मनही उलटसुलट विचारांवर हेलकावू लागतं. पण अशाच वेळी कोणीतरी कानात गुणगुणतं

राजहंसाचे चालणे । भूतळी जालिया शहाणे

आणिके काय कोणे । चालवेंचि ना ॥

या भावनेतून आणि भूमिकेतून संग्रहांची निर्मिती झालेली आहे.

कवयित्रीचे मन सतत शब्दात रंगलेले आहे. मनात कुठेतरी सारख्या कवितेचा विचार सुरू असतो. मनात उसळी घेणाऱ्या विषयाला कवयित्री चटकन् शब्दरूप देऊन कवितेच्या प्रांतात आणून सोडते. कविता ही त्यांना 'आत्मजा' वाटते.

'जगत आले मी ही कविता
उगवला माझ्यातूनच एक
लसलसता लाल कोंभ कवितेचा'
(आत्मजा)

अशी ही कविता मनातून उगवत असताना अनेक रूपरंगातून, गंधातून अनुभूती घेऊन अवतरते आणि सृष्टीचे रहस्य उलगडण्याचा आपल्या परीने प्रामाणिक प्रयत्न करते.

काव्यसृष्टीशी एका अतूट, उत्कट अशा भावबंधाने आपण नकळत बांधले जातो आहोत, असा विश्वास वाटणे, हे महत्त्वाचे आहे. कवयित्रीला असा विश्वास वाटतो.

कल्पनारम्यता, स्वप्नसृष्टी आणि शब्दांची अनाम ओढ या अवकाशात ही कविता आंदोलनं घेत राहते.

*'मनाचे होडके*
*किनारा मागेना*
*दिगंता कळेना*
*वळवू या कैसे'*
(सांज)
किंवा

'वाऱ्याचे बोट धरून अलगद, आकाशाच्या पायऱ्या उतरू लागली चिमुकली लोभस पहाट' (पहाट) अशा ओळी लक्ष वेधून घेतात. सासरी जाताना आईनं दिलेल्या गोधडीची माया लपेटून घेताना कवयित्रीला शांत, सुरक्षित वाटते. 'ज्ञानेंद्रिये असतात माझी सजग अष्टौप्रहर,

होत असतो त्यांचा चराचराशी नित संयोग'
(अशरणागत)

या ओळींमधून नीरव शांततेत मनाला बिलगून बसणाऱ्या शब्दांचा वेध घेऊ बघणाऱ्या कवयित्रीच्या काव्यप्रेमाची प्रचिती येते. मात्र हे जाणवत असतानाच काही वेळा

कवितेतील सैलसरपणा, शब्दांचा भरकटलेपणा खटकल्याशिवाय राहत नाही.

आत्मजा, कवयित्री - मृणालिनी प्रभू अश्वमेध प्रकाशन, किंमत ४० रु.,पृष्ठे ८०

□

**भारतीय अस्मिता जागवणारी कविता**

भारतीय अस्मिता जागवणाऱ्या 'तिरंगा ते भगवा' या कवितासंग्रहात कवी जगदीश देवपूरकर यांनी एकसूत्रता ठेवून संपूर्णपणे सामाजिक कविता हाताळली आहे. संग्रहाच्या शीर्षकावरूनच याची साक्ष पटते.

आपल्या प्रास्ताविक कवितेत या संग्रहाच्या नावाचे स्पष्टीकरण देताना कवी म्हणतो,

'तिरंगा ते भगवा
हा सत्तांतराचा आरसा नाही
तो या देशाच्या संस्कृतीचा वारसा आहे.'

आणि मग 'धर्मनिरपेक्ष राष्ट्र', 'ही तो श्रींची इच्छा' पासून सत्तांतरापर्यंतची क्रांतीची, भारतीय संस्कृतीची कविता या संग्रहात समाविष्ट आहे.

'पंधरा ऑगस्टला
फडफडतो की तडफडतो
आपला प्यारा तिरंगा'
(तडफड)

असे म्हणत, 'राजा बदलला तरी प्रजा तीच आहे, तिरंगा असो की भगवा महागाईने नागवा माणूस मीच आहे, हे सत्य काव्यात ठासून मांडण्याचा रोखठोक धीटपणा संपूर्ण संग्रहात ठळकपणे जाणवतो.

या देशातील भ्रष्टाचार, लाचलुचपत, पक्षीय राजकारण, दलबदलूपणा, सत्तेचे डावपेच या साऱ्यांवर कवी मार्मिक भाष्य करतो.

कशी फुलेल इथे बाग, जिथे भुकेची आग (पदर) असा प्रश्न मांडून 'अरे, एकतरी नीतिवान गरुड या बागेत पाठवा (गरुड)

अशी हुकूमवजा विनंती करीत कवीने इथल्या राजकारण्यांची खिल्ली उडवली आहे.

हिंदू, मुस्लिम, शीख, बौद्ध या जाती आणि त्यातील संघर्ष, तुकाराम, कबीर, आंबेडकर, महात्मा गांधी हे सामाजिक संत आणि बॉंबस्फोट, अयोध्यामंदिर, भूकंप, नागपूरच्या गोवारी समाजातील दगावलेली घरे हे सर्व सामाजिक विषय कवीचे लक्ष्य आहेत.

राजकीय वास्तव स्फोटक शब्दांत व्यक्त करण्याची कला कवीला वश आहे.

हमखास टाळ्या घेणाऱ्या व्यासपीठीय कवितांमध्ये या कवितांचा अग्रक्रमाने समावेश करावा लागेल. कारण यातील आवेशपूर्णता, निर्भीडपणा आणि मिष्कील किंवा मार्मिक खोच श्रोतृवर्गाच्या आणि वाचकांच्याही मनाला जाऊन भिडणारी आहे. कवीचं सामाजिक व्यक्तिमत्त्व या कवितांमधून प्रखरपणे जाणवतं. अन्यायाविरुद्धची चीड आणि लढण्याची ताकदही जाणवते.

माणसामाणसातं पडणारी दरी बुजवण्याचे कार्य कवीला या कवितांमधून करावेसे वाटते आहे. मनातल्या विचारांचे युद्ध कवीला थांबवता येत नाही.

'या विस्कटलेल्या जगात
वासनेच्या बेहोष रात्री
खरीदल्या जातात
अन् बेवारशी वसाहतीत
कागदाच्या तुकड्यावर
सदाफुली चुरगाळल्या जातात'

(विस्कटलेल्या जगात)

ही उद्विग्नता, हे वास्तव चरचरीतपणे मांडण्याची क्षमता कवी आपल्या कवितांमधून सिद्ध करतो.

तिरंगा ते भगवा, कवी : जगदीश देवपूरकर
कविता प्रकाशन, धुळे.
मूल्य : ६० रु., पृष्ठे ८८

□

**मंतरलेल्या क्षणांच्या जाईजुई**

जाई-जुई हा कवयित्री प्रभा सोनवणे यांचा 'चारोळी' प्रकारात अंतर्भूत होणाऱ्या रचनांचा संग्रह.

चंद्रशेखर गोखले या कवीनं साहित्यात आणलेला चोरीळी प्रकार अल्पावधीत अतिशय लोकप्रिय झाला.

'मी-माझा' या गोखले यांच्या चारोळी संग्रहानंतर त्याच धर्तीची अनेक कवींची 'पॉकेटवुक्स' विक्रीसाठी उपलब्ध झाली आणि तारुण्याच्या उंबरठ्यावर असलेल्या महाविद्यालयीन तरुण-तरुणींनी त्यांचे उत्स्फूर्त स्वागत केले.

तरुण पिढी 'फास्ट फूड'ची भोक्ती असल्यामुळेही कदाचित हा प्रकार त्यांना रुचला असावा.

टेस्टी बर्गर, पिझ्झा, नूडल्सप्रमाणे हा सुद्धा झटपट तयार होणारा आणि चटपट मनात उतरणारा मराठी साहित्यप्रकार या पिढीने उचलून धरला. शिवाय मनोरंजनाच्या अनेक प्रकारांमध्ये अडकलेल्या आणि घाईगर्दीमुळे वाचन प्रकाराला दुरावलेल्या मराठी माणसालाही या निमित्ताने साहित्याशी बांधील राहण्याचा आनंद मिळाला.

प्रभा सोनवणे यांच्या चार चार ओळींच्या रचना या जाईजुईच्या चिमुकल्या फुलांप्रमाणेच नाजुक आहेत.

'आलास पाऊस होऊन
भिजली काळीज भुई
मंतरलेल्या क्षणांच्या
झाल्या जाईजुई'

किंवा

'कसे नाही कळले
तू आहसे मृगजळ
तृष्णेलाही समजले
तुझे जीवघेणे छळ'

अशा कोमल रचना रसिक मनात तत्काळ आशय उमलवणाऱ्या आहेत.

'कशी जगावेगळी
आहे माझी प्रीत
विरहाच्या वेदनेतही ओठावरती स्मित'

अशा संवेदना कवयित्रीने शब्दात हळुवार पकडल्या आहेत.

कवयित्री म्हणते, 'या संग्रहातल्या सर्व रचना केवळ तीन तासांतल्या. एका शुक्रवारच्या सकाळी नऊ ते बारा या वेळात अभिव्यक्त झालेलं हे लेखन. इतक्या छोट्याशा कालावधीत अनेक भावकलिका उमलल्या आणि एकापाठोपाठ एक लिहीत गेले.

ही एक विलक्षण अनुभूती.'

कवयित्रीने तिला आलेल्या अनुभूतीचा आनंद रसिकांपर्यंत पोचवला आहे. जाईजुईचा हा सुगंध रसिक वाचकांनीही घ्यावा आणि आपल्या प्रियजनांपर्यंत पोचवावा, या सदिच्छेसहित.

जाई-जुई : प्रभा सोनवणे
अभिमानश्री प्रकाशन, मूल्य २० रु.

□










# कार्यवृत्त

(१ ऑक्टोबर १९९९ ते ३१ मार्च २०००)

□

नंदा सुर्वे

**कै. म. म. द. वा. पोतदार स्मृतिदिन : ६।१०।९९**

इतिहास किंवा तत्सम पुस्तकास रुपये ७५०/- चा हा पुरस्कार देण्यात येतो. तो यंदा डॉ. अरुणा ढेरे यांच्या 'विस्मृती-चित्रे' या ग्रंथास देण्यात आला. प्रसिद्ध इतिहास-संशोधक श्री. निनाद बेडेकर हे अध्यक्षस्थानी होते. परीक्षक म्हणून डॉ. रवींद्र लोणकर आणि श्री. म. श्री. दीक्षित यांनी काम पाहिले. पोतदार घराण्यातील श्रीमती शुभलक्ष्मी पोतदार या कार्यक्रमास उपस्थित होत्या.

**कै. विद्याधर पुंडलीक स्मृतिदिन : ९।१०।९९**

कै. विद्याधर पुंडलीक स्मृतिदिनानिमित्ताने एकांकिका किंवा व्यक्तिचित्र या वाङ्मय प्रकारांना रुपये १,०००/- चे पारितोषिक प्रतिवर्षी देण्यात येते. यंदा ही रक्कम श्रीमती रागिणी पुंडलीक यांच्या विनंतीप्रमाणे 'सकाळ'कडे 'कारगिल रिलीफ फंडा'साठी देण्यात आली.

**१६ ऑक्टोबर १९९९ : विशेष कार्यक्रम**

परिषदेचे माजी कार्यवाह व ज्येष्ठ प्रकाशक श्री. मधुकाका कुलकर्णी, ज्येष्ठ नाट्यसमीक्षक श्री. गो. रा. जोशी, ज्येष्ठ चित्रपट दिग्दर्शक श्री. राम गबाले व ज्येष्ठ चित्रपटसमीक्षक श्री. बापू वाटवे यांचा पंचाहत्तरीच्या निमित्ताने परिषदेतर्फे शाल, पुष्पगुच्छ देऊन सत्कार करण्यात आला. या सर्वांनी या प्रसंगी आपले मनोगत व्यक्त केले.

**कै. व. ह. गोळे स्मरणार्थ व रंगभूमी दिनानिमित्त : ५।११।९९**

कै. व. ह. गोळे स्मरणार्थ व रंगभूमी दिनानिमित्त डॉ. वि. भा. देशपांडे यांचे 'विद्याधर पुंडलीक यांचे नाट्यलेखन' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. आहिताग्नी राजवाडे स्मृतिदिन : २७।११।९९**

थोर विचारवंत श्री. बाळासाहेब भारदे यांचे 'देव आणि धर्म' या विषयावर या निमित्ताने व्याख्यान आयोजित करण्यात आले.

**माधव ज्यूलियन स्मृतिदिन २९।११।९९**

यंदाचा माधव जूलियन स्मृतिदिन कविसंमेलनाने साजरा करण्यात आला. या कविसंमेलनाचे संयोजन डॉ. शंतनु चिंधडे यांनी केले होते. अध्यक्षस्थानी प्रसिद्ध कवयित्री प्राचार्य डॉ. अश्विनी धोंगडे होत्या.

**का. र. मित्र व्याख्यानमाला : १४ डिसेंबर ते २३ डिसेंबर १९९९**

विख्यात साहित्यिक पु. ल. देशपांडे यांच्या वयाची ८० वर्षे पूर्ण झाल्याच्या निमित्ताने 'अभिजात बहुरूपी : पु. ल. देशपांडे' या विषयावर पुढील व्याख्याने आयोजित करण्यात आली.



अनुक्रमणिका

| दिनांक | विषय | व्याख्याते |
| --- | --- | --- |
| १४ डिसेंबर, ९९ | पु. ल. साहित्यिक-माणूस | डॉ. आनंद यादव |
| १५ डिसेंबर | संगीत क्षेत्रातील पु. ल. | प्रा. श्रीराम पुजारी |
| १६ डिसेंबर | चित्रपट-सृष्टीतील पु. ल. | श्री. राम गवाले |
| १७ डिसेंबर | वेगळ्या वाटेचा विनोदकार | श्रीमती मंगला गोडवोले |
| १८ डिसेंबर | व्यक्तिचित्रकार पु. ल. | प्रा. द. मा. मिरासदार |
| १९ डिसेंबर | नाटककार पु. ल. | डॉ. वि. भा. देशपांडे |
| २० डिसेंबर | रंगमंचावरील पु. ल. | श्री. श्रीकांत मोघे |
| २१ डिसेंबर | भाषाशैलीकार पु. ल. | प्रा. स. ह. देशपांडे |
| २२ डिसेंबर | मराठी संस्कृतीचा आनंदयात्री | डॉ. गं. ना. जोगळेकर |
| २३ डिसेंबर | 'पु. ल. : असामान्य वक्ता' | प्राचार्य राम शेवाळकर |

प्रा. ह. श्री. साने यांच्या सहकार्याने ही व्याख्याने स. प. महाविद्यालयात श्रोत्यांच्या तुडुंब उपस्थितीत साजरी झाली.

**२५ डिसेंबर १९९९**

थोर साहित्यिक श्री. म. माटे यांच्या स्मृतिदिनी डॉ. स्वाती कर्वे यांचे, कै. वि. वा. हडप यांच्या जन्मशताब्दीच्या अनुषंगाने 'ऐतिहासिक कादंबरीकार : वि. वा. हडप' या विषयावर व्याख्यान झाले.

**कै. वि. स. खांडेकर जन्मदिन : ११।१।२०००**

कै. वि. स. खांडेकर यांच्या जन्मदिनानिमित्त 'वि. स. खांडेकर : एक समाजशिक्षक' या विषयावर प्रा. शरद वाघ यांचे व्याख्यान.

**१७ जानेवारी २०००**

केशवसुतांच्या स्मरणार्थ विशेष कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले. डॉ. माधवी वैद्य, वृषाली पटवर्धन आणि प्रा. सुजाता शेणई यांनी 'केशवसुत गातचि बसले' हा कार्यक्रम सादर केला. संहिता लेखन प्रा. सुजाता शेणई यांनी केले तर संगीत संयोजन राहुल घोरपडे यांनी केले.

**कै. वि. द. घाटे जन्मदिन : १।१।२०००**

डॉ. व. दि. कुलकर्णी यांचे 'वि. द. घाटे : लेखक आणि माणूस' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले.

**१९ जानेवारी २०००**

कै. चिं. वि. जोशी यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ उत्कृष्ट विनोदी पुस्तकाच्या लेखकास रुपये १,५००/- चे आणि त्या पुस्तकाच्या प्रकाशकास रुपये १,०००/- चे कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत पारितोषिक देण्यात येते. या वर्षी हे पारितोषिक प्रसिद्ध लेखिका श्रीमती दीपा गोवारीकर यांना त्यांच्या 'साष्टांग धप्प' या पुस्तकासाठी देण्यात आले, तर प्रकाशकाचे पारितोषिक 'मेनका प्रकाशन'चे पु. वि. बेहेरे यांना देण्यात आले. बेहेरे यांची कन्या स्वाती चिटणीस यांनी हे पारितोषिक स्वीकारले.

कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी प्राचार्य बाळ गाडगीळ होते. परीक्षक म्हणून श्री. आनंद अंतरकर आणि श्रीमती सुवर्णा दिवेकर यांनी काम पाहिले.

**२४ जानेवारी २००० : दिवाळी अंक १९९९ पारितोषिकांचा वितरण समारंभ**

या दिवशी स. प. महाविद्यालयाच्या ज्ञानेश्वर सभागृंत आयोजित करण्यात आला. प्रत्येकी रुपये १,०००/- ची पारितोषिके मिळविणारे दिवाळी अंक पुढीलप्रमाणे -

रत्नाकर मासिकाचे संपादक अ. स. गोखले स्मृती पारितोषिक

विजेता दिवाळी अंक 'महाराष्ट्र टाइम्स' संपादक - श्री. कुमार केतकर, मुंबई.

'ग्रहांकित'चे संपादक श्री. चंद्रकांत शेवाळे पुरस्कृत दिवाळी अंक पारितोषिके -

'विविध ज्ञानविस्तार'कर्ते रावसाहेब मोरमकर पारितोषिक 'विपुलश्री' संपादिका श्रीमती माधुरी वैद्य, पुणे

मासिक मनोरंजनकार का. र. मित्र पारितोषिक -

'स्रग्धरा' संपादिका - श्रीमती मनीषा शुक्ल, नाशिक.

'किर्लोस्कर'चे आद्य संपादक शं. वा. किर्लोस्कर पारितोषिक

'पद्मगंधा' संपादक - श्री. अरुण जाखडे, पुणे.

याखेरीज दिवाळी अंकांतील उत्कृष्ट ललित लेखास कै. अनंत काणेकर पारितोषिक दिले जाते. हे रुपये २००/- चे पारितोषिक 'कारवार : सृष्टीचा अलंकार' या लेखाबद्दल श्री. रवींद्र पिंगे यांना मिळाले, तर उत्कृष्ट कथेबद्दल कै. दि. अ. सोनटक्के स्मृती पारितोषिक दिले जाते. हे रुपये ५००/- चे पारितोषिक 'मरुवेल' या कथेबद्दल श्रीमती अनुराधा चिन्मुळगुंद यांना मिळाले. या स्पर्धेचे परीक्षक होते डॉ. शंतनु चिंधडे, डॉ. न. म. जोशी, श्री. म. श्री. दीक्षित. अध्यक्षस्थानी प्राचार्य ह. श्री. साने होते.

**२५ जानेवारी २०००**

७३ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे नियोजित अध्यक्ष डॉ. य. दि. फडके यांचा प्रकट सत्कार म. सा. परिषदेचे अध्यक्ष श्री. राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते करण्यात आला. या वेळी प्रा. ग. प्र. प्रधान आणि डॉ. नागनाथ कोत्तापल्ले यांची भाषणे झाली.

तसेच याच वेळी परिषदेने पुनर्मुद्रित केलेल्या मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड ३, ४, ५ या ग्रंथांचे प्रकाशन डॉ. य. दि. फडके यांच्या हस्ते करण्यात आले.

**२७ फेब्रुवारी २०००**

या दिवशी कवी कुसुमाग्रज यांच्या स्मरणार्थ कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुरस्कृत काव्यसंग्रहाला पारितोषिक देण्यात येते. या वर्षी या पारितोषिकासाठी 'चाहूल वसंताची' या श्री. दत्ता हलसगीकर यांच्या संग्रहाची निवड करण्यात आली. हे पारितोषिक रुपये १,५००/-चे आहे. तर प्रकाशकासाठी असणारे रु. १,०००/- चे पारितोषिक सुविद्या प्रकाशन, सोलापूर यांना देण्यात आले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी कवी वसंत बापट होते. परीक्षक म्हणून डॉ. गं. ना. जोगळेकर व प्रा. माधवी पटवर्धन यांनी काम पाहिले. या निमित्ताने कुसुमाग्रजांचे बंधू प्राचार्य के. रं. शिरवाडकर यांच्या सहकार्याने, महाविद्यालयातील विद्यार्थी-विद्यार्थिनींसाठी

कुसुमाग्रजांच्या कवितांची वाचन स्पर्धा आयोजित करण्यात आली होती. त्याचा पुरस्कार वितरण समारंभ याच वेळी श्री. वसंत वापट यांच्या हस्ते झाला. स्पर्धेचे परीक्षक म्हणून श्रीमती हेमा लेले आणि डॉ. वीणा देव यांनी काम पाहिले. स्पर्धेचे संयोजन डॉ. कल्याणी दिवेकर यांनी केले.

**९ मार्च २०००**

महाराष्ट्र कवी यशवंत यांच्या स्मरणार्थ उत्कृष्ट कवितासंग्रहास रुपये १,०००/- चा पुरस्कार देण्यात येतो. तो या वर्षी श्रीमती मनीषा दीक्षित या कवयित्रीस त्यांच्या 'रेतीवरल्या रेघा' या काव्यसंग्रहावद्दल देण्यात आला. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी प्रसिद्ध कवी, गीतकार गंगाधर महांवरे होते. परीक्षक म्हणून डॉ. गं. ना. जोगळेकर आणि प्रा. माधवी पटवर्धन यांनी काम पाहिले. या वर्षी भावे प्राथमिक शाळेच्या इयत्ता ४ थी मधील विद्यार्थी - विद्यार्थिनींनी यशवंतांच्या 'मोतीवाग' मधील निवडक कवितांचे गायन केले. मुख्याध्यापिका उज्ज्वला गायकवाड व शिक्षिका श्रीमती वीणा नाशिककर यांनी या कार्यक्रमाचे संयोजन केले होते.

**१३ मार्च २०००**

ज्येष्ठ लेखिका श्रीमती ज्योत्स्ना देवधर पुरस्कृत 'शरदवावू' लेखिका पुरस्कार वितरण समारंभ आयोजित करण्यात आला. प्रसिद्ध लेखिका श्रीमती आशा कर्दळे यांना त्यांच्या 'विदेश' या कादंबरीवद्दल हा रु. ५,०००/- चा पुरस्कार देण्यात आला. श्रीमती कर्दळे यांनी आपले मनोगत या प्रसंगी व्यक्त केले. या वेळी श्रीमती ज्योत्स्ना देवधर यांनी 'शरदवावू व रवींद्रनाथ' यांच्यातील पत्रसंवादाचे वाचन केले. अध्यक्षस्थानी परिषदेचे माजी कार्याध्यक्ष डॉ. म. वि. गोखले होते. त्यांनी या वेळी 'वि. वा. हडप यांच्या सामाजिक कादंवऱ्या' या विषयावर भाषण केले.

**२० मार्च २०००**

कै. बा. सी. मर्ढेकर यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्रसिद्ध समीक्षक प्रा. माधवी चाफेकर, मुंवई यांचे 'मर्ढेकर व नवसाहित्य' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले.

**२१ फेब्रुवारी २०००**

म. सा. परिषद व पुणे विद्यापीठ मराठी विभाग यांच्या संयुक्त विद्यमाने प्रा. रा. श्री. जोग यांचा २३ वा स्मृतिदिन साजरा करण्यात आला. प्रा. रा. श्री. जोग स्मरणार्थ देण्यात येणाऱ्या 'समीक्षा पारितोषिका' साठी लेखकास रुपये ३,५००/- व प्रकाशकास रु. ७५०/- साठी डॉ. अक्षयकुमार काळे यांच्या 'अर्वाचीन मराठी काव्यदर्शन' या ग्रंथाची निवड करण्यात आली होती.

अध्यक्षस्थानी डॉ. अरविंद वामन कुलकर्णी होते. या वेळी डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, डॉ. गं. ना. जोगळेकर यांची भाषणे झाली. डॉ. अक्षयकुमार काळे यांनी ग्रंथासंबंधीची आपली भूमिका स्पष्ट केली. प्रकाशक श्री. मधुसूदन वनहट्टी यांनीही आपले मनोगत व्यक्त केले. डॉ. अ. वा. कुलकर्णी यांचे 'प्रा. रा. श्री. जोग : माणूस आणि लेखक' या विषयावर भाषण झाले.

**२२ व २३ मार्च २०००**

प्रा. रा. श्री. जोग स्मृतिव्याख्यानमाला महाराष्ट्र साहित्य परिषद अणि पुणे विद्यापीठ

मराठी विभाग यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित करण्यात आली. डॉ. सरोजिनी वैद्य यांचे 'प्रा. वा. व. पटवर्धन : व्यक्ती व लेखन' व 'प्रा. वा. व. पटवर्धन यांचा काव्यविचार' या विषयांवर ही व्याख्याने झाली.

**२९ मार्च २०००**

इतिहास संशोधक कै. शं. ना. जोशी स्मृतिदिनानिमित्त वैचारिक ग्रंथासाठी रु. ५,०००/- चे पारितोषिक देण्यात येते. या वर्षी ते डॉ. रा. भा. पाटणकर यांना त्यांच्या 'अपूर्ण क्रांती' या ग्रंथाबद्दल देण्यात आले. डॉ. पाटणकर यांच्या वतीने हे पारितोषिक श्री. वसंत जहागीरदार यांनी स्वीकारले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी समीक्षक डॉ. रा. ग. जाधव होते. कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनीही या ग्रंथासंदर्भात आपले विचार व्यक्त केले.

## शाखावृत्त

**शाखा अंबरनाथ**

दिनांक ९ जानेवारी २००० या दिवशी 'चंद्र माझा' या चंद्रविषयक गीतांच्या व कवितांच्या कार्यक्रमाचे आयोजन येथील हेरंब मंदिर सभागृह येथे करण्यात आले होते. सदर कार्यक्रम 'शब्दांकित' या साहित्यप्रेमी वृंदाच्या वतीने सादर करण्यात आला. सादरकर्त्या होत्या आशा साठे, माधवी जोग, अनुराधा जोग व गायिका रमा सुंदरम.

या कार्यक्रमात सुरुवातीला शाखेचे अध्यक्ष श्री. अरुण मेंड यांना महाराष्ट्र शासन शिक्षण विभागाच्या वतीने शोधनिबंधास देण्यात येणारा प्रथम पुरस्कार मिळाल्याबद्दल त्यांचा सत्कार करण्यात आला. उपाध्यक्ष प्रवीण कारखानीस यांच्या 'अष्टौचक्री रामायण' या ग्रंथास उत्कृष्ट ग्रंथनिर्मितीचा पुरस्कार मिळाल्याबद्दल त्यांचाही सत्कार करण्यात आला.

कार्यक्रमाचे प्रास्ताविक कार्यवाह समीर नाडगौडा यांनी केले, तर परिणीता देशपांडे व पूर्वा अष्टपुत्रे यांनी सूत्रसंचालन केले. अनिता वझे यांनी आभार मानले. शाखेच्या ज्येष्ठ सभासद श्रीमती शशिकला टाकळकर यांच्या हस्ते मान्यवरांचा सत्कार करण्यात आला.

**शाखा डोंबिवली**

दिनांक ११ डिसेंबर १९९९ रोजी डॉ. ललिता दीपक नामजोशी यांचे ' 'कुरल' तामीळ वेद एक परिचय' या विषयावर व्याख्यान झाले.

दिनांक २४ डिसेंबर १९९९ रोजी डॉ. वृंदा कौजलगीकर यांचे 'साठोत्तरी मराठी ग्रामीण कादंबरी' या विषयावर व्याख्यान झाले.

**ठाणे जिल्हा**

दिनांक १६ मे १९९९ रोजी कवयित्री विभावरी अंतरकर यांचा 'गझलांचा गालिचा' हा स्वरचित काव्यवाचनाचा कार्यक्रम सादर करण्यात आला.

जून १९९९ च्या दुसऱ्या आठवड्यात प्रा. पुष्पा राजापुरे-तापस यांचे व्याख्यान आयोजित केले होते.

दिनांक १६ सप्टेंबर १९९९ या दिवशी प्रा. म. वि. फाटक स्मृतिपुष्प प्रा. डॉ. वसुधा सहस्त्रबुद्धे यांच्या 'प्रयोगशील नाटककार डॉ. शंकर शेष' या व्याख्यानाने गुंफले गेले. डॉ. शेष यांच्या विविध पैलूंचा त्यांनी व्याख्यानात आढावा घेतला.

दिनांक १६ जानेवारी २००० या दिवशी प्रसिद्ध कवयित्री गीतकार वंदना विटणकर यांचे 'माझ्या गाण्यांची स्मरणगाथा' या विषयावर भाषण झाले.

दिनांक २६ फेब्रुवारी २००० या दिवशी 'मराठी नाट्यसंगीत - स्वरूप आणि समीक्षा' या विजया टिळक लिखित प्रबंधग्रंथाचे प्रकाशन नटश्रेष्ठ भालचंद्र पेंढारकर यांच्या हस्ते करण्यात आले. त्या वेळी वक्ते होते, डॉ. दाजी भाटवडेकर व प्रा. डॉ. अनंत देशमुख. श्रीकृष्ण दळवी यांनी विजया टिळक यांची मुलाखत घेतली.

**शाखा कुळगाव - बदलापूर**

दिनांक १८, १९, २० फेब्रुवारी २००० या तारखांना कुळगाव काटदरे सभागृहात 'साहित्य जल्लोष' असा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. या कार्यक्रमाच्या अंतर्गत १८ तारखेला 'आत्मचरित्रे किती खरी - किती खोटी' हा परिसंवाद झाला. डॉ. गं. ना. जोगळेकर हे परिसंवादाच्या अध्यक्षस्थानी होते. डॉ. आनंद यादव व श्री. श्याम जोशी यांनी आपले विचार व्यक्त केले. श्री. प्रकाश देशपांडे यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

१९ तारखेला कविकट्टा अर्थात कविसंमेलन घेण्यात आले. त्यामध्ये श्री. वसंत बापट, श्री. विदा. करंदीकर, श्री. मंगेश पाडगावकर आणि श्री. शंकर वैद्य या ज्येष्ठ कवींचाही सहभाग होता.

२० तारखेला 'संतसाहित्याचे योगदान' या विषयावर श्री. यशवंत पाठक यांचे व्याख्यान झाले. सूत्रसंचालन अंजली देशमुख यांनी केले.

**शाखा फलटण**

दिनांक २९।११।९९ ला कविवर्य माधव जूलियन यांची ६० वी पुण्यतिथी सभा येथील श्रीराम विद्याभवनाच्या मुक्तांगण सभागृहात आयोजित करण्यात आली. त्या वेळी प्रमुख पाहुणे म्हणून मुधोजी महाविद्यालयातील प्रा. डॉ. प्र. ना. दीक्षित यांना निमंत्रित केले होते. अध्यक्षस्थानी शाखेचे अध्यक्ष रवींद्र बेडकीहाळ होते.

या वेळी आयोजित करण्यात आलेल्या निमंत्रितांच्या कविसंमेलनात ३५ कवींनी भाग घेतला होता.

'माधव जूलियनांसारख्या उदात्त प्रेमविचारांच्या कवींच्या कविता आजच्या काळात मार्गदर्शक ठरतील,' असे विचार प्राचार्य चंद्रकांत काळे यांनी आपल्या भाषणात व्यक्त केले.

कार्यक्रमाच्या सुरुवातीला प्राचार्य चंद्रकांत काळे यांच्या हस्ते दीपप्रज्वलन झाले, तर प्रा. प्र. ना. दीक्षित यांच्या हस्ते माधव जूलियन यांच्या प्रतिमेस पुष्पहार घालण्यात आला. कार्याध्यक्ष प्रा. डॉ. मधुकर जाधव यांनी प्रास्ताविक केले व उपस्थितांचे स्वागत केले.

कविसंमेलनाचे आभार श्री. पी. आर. इनामदार यांनी मानले, तर एकूण कार्यक्रमाचे आभार कार्यवाह श्री. बापूसाहेब मोदी यांनी मानले. श्रीमती दीपा निंबाळकर यांनी सूत्रसंचालन केले.

**पिंपरी-चिंचवड शाखा**

दिनांक २९।९।१९९९ रोजी वार्षिक सर्वसाधारण सभा होती. सभेस म. सा. प. कार्यकारी सदस्य श्री. अरविंद भुजबळ, डॉ. श्री. श्री. घारे, तात्या चिंचवडे आदी

प्रदसिद्ध सल्लागार उपस्थित होते. अध्यक्षस्थानी श्रीमती माधुरी ओक होत्या. उपस्थितांचे स्वागत श्री. गुलाब विरदवडे यांनी केले. २००१ चे विभागीय साहित्य संमेलन चिंचवड येथे करण्याबाबत ठराव संमत करण्यात आला. शाखेच्या नवीन कार्यकारिणीची निवड करण्यात आली. त्यात अध्यक्ष प्राचार्य गुलाबराव देशमुख, उपाध्यक्ष श्री. अमृत पऱ्हाड, कार्याध्यक्ष श्री. गुलाबराव विरदवडे, कार्यवाह श्री. अरुण बोऱ्हाडे, श्रीमती मनीषा बाडेकर, कोषाध्यक्ष श्री. सुहास घुमरे तर निमंत्रक सदस्य म्हणून श्री. अरविंद भुजबळ यांची निवड झाली. उपस्थितांचे आभार श्रीमती मनीषा बाडेकर यांनी मानले.

दि. २३।१०।१९९९ रोजी चिंचवड येथील काकडे पार्कमध्ये कोजागिरीनिमित्त कविसंमेलन झाले. कविसंमेलनाचे अध्यक्ष म्हणून श्री. अरविंद भुजबळ उपस्थित होते, तर प्रमुख पाहुणे म्हणून श्री. गुलाबराव विरदवडे उपस्थित होते. संमेलनात संजीवनी तोफखाने, सुहास घुमरे, कैलास बहिरट, रूपाली अवचरे, शोभा जोशी इ. कवींनी भाग घेतला. नवोदितांसाठी काव्यस्पर्धा आयोजित करण्यात आली होती. त्याचे परीक्षक म्हणून श्री. विद्यासागर वाघेरे यांनी काम पाहिले. विजेत्या कवींना श्री. गुलाबराव विरदवडे यांच्या हस्ते पारितोषिके देण्यात आली. भाग्यश्री कुलकर्णी यांनी आभार मानले.

दिनांक ३१।१०।१९९९ रोजी पिंपरी-चिंचवड शाखा व ॲन्टिबायोटिक्स क्लब यांच्या संयुक्त विद्यमाने एच. ए. कॉलनीतील वेल्फेअर सेंटर हॉलमध्ये कविसंमेलन आयोजित केले होते. संमेलनाच्या अध्यक्षस्थानी सामाजिक कार्यकर्ते श्री. गुलाबराव विरदवडे होते, तर प्रमुख पाहुणे म्हणून श्री. अरविंद भुजबळ व श्रीमती कमलताई जगताप उपस्थित होते.

**विभागीय साहित्य संमेलन - सोलापूर**

प्रतिवर्षी साहित्य परिषदेच्या कार्यक्षेत्रात विभागीय संमेलन भरविण्यात येते. या वर्षी साहित्य परिषदेच्या सोलापूर शाखेने ही जबाबदारी स्वीकारली होती. प्रा. श्रीराम पुजारी व त्यांचे सहकारी यांच्या पुढाकाराने २९ व ३० जानेवारी २००० या दिवशी हुतात्मा स्मृती मंदिर या प्रेक्षागृहात श्रोत्यांच्या भरगच्च उपस्थितीत, उत्साहाच्या वातावरणात हे दहावे संमेलन साजरे झाले. संमेलनाच्या अध्यक्षस्थानी कविवर्य श्री. मंगेश पाडगावकर यांची एकमताने निवड करण्यात आली होती. उद्घाटक म्हणून कविवर्य वसंत बापट व प्रमुख पाहुणे म्हणून कविवर्य श्री. नारायण सुर्वे हे उपस्थित होते.

२९ जानेवारी रोजी संमेलनाचे उद्घाटन व अध्यक्षीय भाषण हे कार्यक्रम प्रामुख्याने होते. कार्यक्रमाचे सूत्रसंचालन श्री. लक्ष्मीनारायण बोल्ली व श्रीमती शोभा बोल्ली यांनी केले. प्रारंभी परिषदेचे कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी विभागीय संमेलने भरविण्यामागची परिषदेची भूमिका आपल्या भाषणात मांडली. स्वागताध्यक्ष श्री. सुशीलकुमार शिंदे हे उपस्थित राहू न शकल्याने त्यांचे भाषण सुप्रसिद्ध समीक्षक डॉ. निर्मलकुमार फडकुले यांनी वाचले. अध्यक्ष श्री. मंगेश पाडगावकर यांनी काव्यनिर्मितीसंबंधी मार्मिक विचार व्यक्त केले.

श्री. वसंत बापट यांनी संमेलनाचे उद्घाटन करताना सोलापूर संबंधीच्या अनेक हृद्य आठवणी सांगितल्या.

दिनांक २९ ला सायंकाळी ज्येष्ठ नाट्य कलावंत डॉ. श्रीराम लागू यांची प्रकट मुलाखत सुप्रसिद्ध मुलाखतकार श्री. सुधीर गाडगीळ यांनी घेतली. ही मुलाखत अतिशय रंगतदार झाली. याच दिवशी सायंकाळी ज्येष्ठ व नवोदितांचे कविसंमेलन मोठ्या उत्साहात पार पडले.

३० जानेवारी रोजी सकाळी 'मी आणि माझ्या लेखनाची प्रेरणा' या विषयावर परिसंवाद घेण्यात आला. अध्यक्षस्थानी श्री. नारायण सुर्वे होते. यावेळी ज्येष्ठ लेखक प्रा. त्र्यं. वि. सरदेशमुख, डॉ. सरोजिनी वैद्य आणि नारायण सुर्वे यांनी आपल्या लेखनासंबंधी सविस्तर विवेचन केले.

त्याच दिवशी दुपारी 'प्रसारमाध्यमे आणि समाजजीवन' या विषयावर परिसंवाद घेण्यात आला. अध्यक्षस्थानी ज्येष्ठ समीक्षक डॉ. निर्मलकुमार फडकुले होते. या परिसंवादात सोलापूर नभोवाणी केंद्राचे संचालक श्री. अनिल देशमुख, नाट्यसमीक्षक डॉ. वि. भा. देशपांडे व डॉ. फडकुले यांनी आपली मते मांडली. अनेक श्रोत्यांनी या वेळी वक्त्यांना प्रश्न विचारले. त्यामुळे हा कार्यक्रम अधिकच प्रभावी झाला.

परिसंवादानंतर कविसंमेलनाचा उत्तरार्ध पार पडला. या वेळीही अनेक नवोदितांनी आपल्या कविता सादर केल्या. श्री. दत्ता हलसगीकर यांनी सूत्रसंचालन केले.

यानंतर लगेच संमेलनाचा समारोप समारंभ झाला. या प्रसंगी सोलापुरातील अनेक ज्येष्ठ लेखक-लेखिकांचा सत्कार करण्यात आला. श्री. मंगेश पाडगावकर यांनी अध्यक्षीय समारोपाचे भाषण केले. संयोजक प्रा. श्रीराम पुजारी यांचे आभारप्रदर्शनाचे भाषण झाले.

दोन दिवसांचा हा साहित्य सोहळा यशस्वीपणे साजरा करण्यात अध्यक्ष निर्मलकुमार फडकुले, उपाध्यक्ष प्रा. श्रीराम पुजारी, प्रा. दत्ता हलसगीकर आणि कार्याध्यक्ष मीर इसहाक शेख यांचे मोलाचे सहकार्य लाभले.

**पंढरपूर शाखा मेळावा**

प्रतिवर्षी परिषदेच्या विविध शाखांचा दिवसभराचा मेळावा घेण्यात येतो. या वर्षी हा मेळावा घेण्याची जबाबदारी पंढरपूर शाखेने स्वीकारली होती. रविवार दिनांक १२ डिसेंबर १९९९ या दिवशी सकाळी १० ते सायंकाळी ४ या वेळी उत्साहाच्या वातावरणात मेळाव्याचा कार्यक्रम पार पडला. परिषदेच्या विविध जिल्ह्यांमधील शाखांचे सुमारे ५० प्रतिनिधी शाखा मेळाव्यास उपस्थित होते. कार्याध्यक्ष डॉ. गं. ना. जोगळेकर यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या मेळाव्यात विविध शाखांच्या कार्यकर्त्यांनी आपापल्या कार्याचे निवेदन केले तसेच शाखेपुढील अडचणींचीही माहिती दिली. या निमित्ताने परिषदेच्या ग्रंथपुरस्कारांची, ग्रंथालयाची व परीक्षांची माहिती सर्वांना देण्यात आली.

या मेळाव्यात सर्व शाखा प्रतिनिधीप्रमाणेच डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. कल्याणी दिवेकर, श्री. रंगा मराठे, डॉ. द. ता. भोसले आणि श्री. द्वैपायन वरखेडकर अशा अनेकांनी भाषणे केली. पंढरपूर शाखेच्या सर्व कार्यकर्त्यांनी शाखामेळाव्याचे संयोजन अतिशय नेटकेपणाने केले होते. □



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत




महाराष्ट्र
साहित्य
परिषद


अनुक्रमणिका



Maharashtra
Sahitya Patrika (
April, May, June 2
Registered with the
Registrar of
Newspapers for In
Under No. 6398/5

य. दि. फडके
७३ व्या अखिल भ
साहित्य संमेलनाचे

डॉ. य. दि. फडके
३.१.१९३१
एम्. ए. पीएच्. डी.
१९५४-६० पर्यंत अहमदनगर, हैद्राबाद, मुंबई व औरंगाबाद येथील खासगी व शासकीय महाविद्यालयात राज्यशास्त्र या विषयाचे अध्यापन.
१९६० ते ८० पर्यंत मुंबई विद्यापीठाच्या राज्यशास्त्र विभागात अध्यापन.
१९८० ते ८४ पर्यंत पुणे विद्यापीठाच्या राज्यशास्त्र विभागात महात्मा गांधी अध्यासनाचे प्राध्यापक.
१९८४ पासून मुंबईच्या टाटा सामाजिक विज्ञान संस्थेत संशोधन .
इंग्रजी ग्रंथ लेखन, प्रभावी वक्ते.



३, आनंदवन, साहित्य सहवास,
चौथा रस्ता, गांधी नगर,
बांद्रे (पूर्व) मुंबई ४०० ० ५१.
फोन नं. ६४२१४१२




अनुक्रमणिका